**जांबावली ते आंबीवली / Jambavali te Ambivali**

प्रकाशक :
राजू वि. भानारकर
मुक्तांगण प्रकाशन - द्वारा सुयश ट्रेडर्स बुक सेलर्स
११४९ सदाशिव पेठ,
पुणे - ४११०३०.

प्रथमावृत्ती :
१५ ऑगस्ट २००७


विठ्ठलराय भट
आंबटकर कंपौंड
आंबिवली (प.) पो.मोहने,
जि. ठाणे - ४२११०२
मोबाईल - ९२२१३०९७५८

अक्षरजुळणी :
पालवी ग्राफीक्स् , पुणे -३७
दूरध्वनी क्र. (०२०) २४२१०४२३
मोबाईल : ९९२२४२३२०६

मुखपृष्ठ :
श्रीकृष्ण ढोरे

किंमत :
९०/- रुपये.

मित्रवर्य

ॲड. अनिल कदम

व

श्री.अनंत सावंत (दादा)

यांस.....

## विठ्ठलराय भट यांचे प्रकाशित साहित्य

---

१) क्रांतिवीर भगतसिंग
२) भारतरत्न मानकरी
३) सरस्वतीचे दशपुत्र
४) प्राचीन भारतीय विश्वविद्यालये -नालंदा व तक्षशीला
५) आहे बहुगुणी....
६) चौदा भारतीयरत्ने
७) भारतीय नवरत्ने
८) चेराबंडराजू
९) गोमंतकातील अग्निफुले
१०)नोबेल पारितोषिक विजेते डॉ. अमर्त्य सेन
११) सामाजिक क्रांतीचा अग्रदूत - डॉ. बाबासाहेब आंबेडकर
१२) युगपुरुष पंचक
१३) अध्यात्मवाद -फेरमांडणी
१४) बारा लेख
१५) अजब भारतीय
१६) आम्ही हे असे !
१७) भारतपुत्रांची जीवनगाथा
१८) सोनिया गांधी एक गूढ व्यक्तिमत्त्व
१९) अतिरेक्यांचा कर्दनकाळ - जे. एफ. रिबेरो
२०) बहुभाषिक समानार्थी इंद्रधनुषी म्हणी
२१) नोकरनामा
२२) भारतमातेचे निवडक सुपुत्र

* आगामी

१) मर्दानी झांशीवाली
२) राजयोगिनी अहिल्याबाई होळकर
३) नादब्रह्माचे मान करी
४) वलयांकित साहित्यिक
५) मोर नाचरा हवा.....
६) उमललेली शब्दफुले
७) नेताजी सुभाषचंद्र बोस

# निवेदन

"नोकरनामा" हे आत्मचरित्रात्मक मालेतील पहिले पुष्प प्रकाशित होऊन काही महिने लोटले. वाचक व समीक्षक; नातेवाईक तसेच मित्रमंडळी यांच्याकडून भरभरून प्रतिसाद लाभला. त्यामुळे हुरूप येऊन मी पुढील भाग, "जांबावली ते आंबिवली" लिहिण्याचा संकल्प केला.

"नोकरनाम्या"त मी केलेल्या नोकऱ्या व केलेले व्यवसाय यांच्याबाबत तपशीलाने लिहिलेले आहे. त्या पुस्तकात माझे कौटुंबिक जीवन तसेच सामाजिक क्षेत्रातील कामाचा उल्लेख नव्हता. ती कसर मी या पुस्तकात भरून काढलेली आहे.

हे पुस्तक लिहिताना लेखनिक म्हणून मला, श्री अनिरूद्ध राणे, कु. प्रियांका पांगरे, कु. प्रियांका चव्हाण कु. प्रिया कौरती व कु. सोनाली जाधव यांची भरीव मदत झाली. त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. पुस्तकाची मुद्रणप्रत अतिशय सुंदर व सुवाच्य अक्षरात लिहून दिल्याबद्दल कु. पुष्पा शिंदे यांचा मी अत्यंत आभारी आहे.

मुक्तांगण प्रकाशनाचे मालक व माझे मित्र श्री. राजू भानारकर यांनी प्रकाशनाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतल्यामुळे मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे.

या पुस्तकाचा पुढील भाग "इये ग्रंथाचिये नगरी' या नावाने प्रकाशित होणार आहे.

विठ्ठलराय भट,
आंबटकर कंपौंड,
आंबिवली (पश्चिम)
पोस्ट - मोहने.
जिल्हा - ठाणे ४२११०२.
मोबाईल नं. : ९२२१३०९७५८

***

कस्य एकांतं सुखम् उपनतम् ।
दुःखम् एकांततः वा ।।
नीचैः गच्छति उपरि च ।
चक्रनेमीक्रमेण ।।

सुभाषित

" कुणास मिळते अविरत सुख वा
अविरत दुःख या जगती ?
एकामागुनी दुसरे येते
असते त्यांना चक्रगती "

- मराठी अनुवाद

# १

''भटो ! तुका चलो जालो रे !'' (भटा, तुला मुलगा झाला रे !) बाळंतकुडीतून 'माय' चा आवाज आला. बाहेर लांबलचक चौकीवर अस्वस्थपणे फेऱ्या घालणारे, दाढी–मिश्या वाढलेले बाबन भट बंद दाराजवळ झपाझप पाऊले टाकीत पोहचले. पाठोपाठ त्यांचा पुतण्या बाबू (अनंत नारायण भट) व बाबूची आई (लक्ष्मीबाई) लगबगीने निघाले. सुईण 'माय' बाळंतकुडीचा दरवाजा उघडून, दोन्ही हातांत धरून गुटगुटीत सावळ्या रंगाचा, भरपूर जावळ असलेला, अजून वार (नाळ) न तोडल्या गेलेल्या मुलाला घेऊन बाहेर आली. त्या गावात 'माय' ही एकच सुईण होती. ती धर्माने ख्रिश्चन असून किरिस्तांव वाड्यावर राहत होती. त्या लहानशा गावातील बहुतांश मुले तिच्या हातूनच जन्माला आलेली असायची. म्हातारी झाल्यावर जरा भ्रमिष्ठ झाल्यासारखी होऊन ती गावभर बडबडत फिरत असे. कोणी टारगट मुलाने तिची खोड काढल्यास ती रागाने फचकन थुंकून ओरडायची, ''रांडेच्या ! तू माझी मस्करी करतोस ? तुझ्या आईच्या पोटातून मी तुला या हातांनी ओढून बाहेर काढले आहे.'' तेवढं ऐकल्यावर तो टारगट पोरगा तिथे क्षणभरही न थांबता पळ काढत असे.

मायने बाहेर आणलेलं बाळ बाहेरच्या झकझकीत सूर्यप्रकाशाने डोळे दिपून गेल्यामुळे चहूकडे मिचमिच्या डोळ्यांनी पहात होते. आपल्या आईच्या इशाऱ्यानुसार बाबूने बाळाला आपल्या हाती घेतले व बाहेरच्या अंगणात ठेवलेल्या मोठ्या केळीच्या पानावर ठेवले. आपले हात न धुताच बाबू शेजारीच असलेल्या व्यंकटरमण मठातील एक पुजारी, श्रीनिवास भट (शिनवास) यांना बोलवायला धावला; कारण बाबन भटाने मुलगा झाल्यास ''पुत्रायणविधी'' करणार असा संकल्प केला होता. त्यामुळेच तो विधी पूर्ण झाल्याशिवाय बाळाची नाळ कापली जाणार नव्हती. शिनवास भटाला बोलावून आणताच बाबूला हजामवाड्यावरून बाबय महाले याला (न्हाव्याला) बोलवायला पाठवले. तो येताच क्षौरविधी आटपून, स्नान करून बाबन भटाने यथासांग 'पुत्रायणविधी' पार पाडला. मग बाळाची नाळ कापून, आंघोळ घालून त्याला बाळंतकुडीत आईच्या कुशीत देण्यात आले.

पुत्रायणविधी पार पडलेले बाळ म्हणजेच, मी !

भरघोस दानदक्षिणा घेऊन श्रीनिवास भट आनंदाने घरी परतले. ब्राह्मण वाड्यावरील बायकामुले नवजात बालकाला बघायला बाबन भटाच्या घरी जमायला लागले.

माझे बाप्पा म्हणजे, श्री. देवीदास विठ्ठल भट. त्यांना सर्वजण ''बाबन'' या प्रेमळ नावाने हाक मारीत. ते पौरोहित्य (भिक्षुकी) करायचे. सर्व तऱ्हेचे धार्मिक विधी शास्त्रोक्त रीतीने पार पाडण्यात ते पारंगत होते. स्वभावाने प्रेमळ, नम्र व मितभाषी असल्याने सर्वांना बाबन भट 'प्रिय वाटायचे.बाप्पाचे पहिले लग्न कडवाड गावच्या नदीकाठच्या पलीकडे सुंकेरी येथे राहणारे श्री.वेदव्यास भट यांच्या थोरल्या मुलीशी झाले होते (वत्सला). लग्नानंतर दुसऱ्याच वर्षी तिला एक मुलगा झाला. दुर्दैवाने बाळ व बाळंतीण या दोघांनाही लिव्हरची बिमारी झाली व त्यातच त्यांचा अंत झाला. तरुण वयातच बाप्पा विधुर झाले. दुसरा विवाह करणे त्यांना भाग होते. म्हणून वधू संशोधनाला प्रारंभ झाला.

२

अंकोल्यातील व्यंकटरमण देऊळाचे पुजारी श्री.भिक्कू भट व सौभाग्यवती कल्याणी (कंका) यांना तीन मुली व दोन मुलगे. थोरली मुलगी गंगा, तिचा विवाह अंकोल्यातीलच तेंकणकेरी या उपनगरातील जमीनदार श्री. माधव कामत यांच्याशी पार पडला होता. दुसरी मुलगी तारा; तिच्यासाठी वर संशोधन चालू होते. तिचा विवाह यल्लापूर येथील एक श्रीमंत ''तोटगार'' (बागायतदार) भट घराण्यातील एका मुलाशी ठरला होता. लग्नाची सर्व तयारी चालू असताना एक भयंकर वार्ता अंकोल्याला येऊन थडकली. रानात वनौषधी आणायला म्हणून गेलेला ताराच्या नियोजित वराला वाघाने फाडून खाल्ले होते. भिकू भटाच्या घरी हलकल्लोळ माजला. लग्नासाठी म्हणून केलेली सर्व तयारी व्यर्थ झाली होती.

तारासाठी दुसरा मुलगा बघण्याची आवश्यकता होती. तिचा काहीच दोष नसताना तिच्या कपाळी ''अवलक्षणी मुलगी'' असा शिक्का बसला. त्यामुळे नवा संबंध जुळवताना अडचणी यायला लागल्या. मुलगी वयाने वाढत चालली होती. त्यामुळे भिकू भट चिंताक्रांत झाले होते. कोणीतरी त्यांना कडवाड येथील श्री. देवीदास विठ्ठल भट हे दुसरा विवाह करण्यासाठी मुलीच्या शोधात असलेली बातमी सांगितली. अशा प्रकारे बाप्पाची सोयरीक जुळून आली. तारा

हे नाव बदलून तिचे पद्मावती असे नामकरण करण्यात आले व ती सासरी आली. तीच आम्हां सहा भावंडांची आई.

लग्नाच्या वेळी आई १५ वर्षांची तर बाप्पा २५ वर्षांचे होते. दोघांच्या वयात १० वर्षांचा फरक होता. आई गोरीपान, रूपवान; पण ठेंगू, बुटबैंगण - फक्त पाच फुट उंचीची; तर बाप्पा काळेसावळे धडधाकट व सहाफूट लंबूटांग अशी त्यांची विजोड जोडी होती.

३

लग्नाला पाच वर्षे पूर्ण झाली तरी पाळणा हलला नाही म्हणून आई-बाप्पा चिंतित होते. कडवाड जवळील किन्नर या गावी आमचे लांबचे नातेवाईक श्री. नारायण कार्लेकर राहायचे. त्यांना सर्वजण ''कल्लो नारायण'' म्हणून ओळखत असत. त्यांच्या अंगात अवसर (वारे) यायचे. अंगात वारे आल्यावेळी बाप्पांनी त्यांना आपणाला मूल होत नसल्याचे कारण विचारता, ते म्हणाले, ''तुझा एक काका ब्रह्मचारी म्हणून मेला. त्याचा आत्मा अतृप्त आहे. त्यासाठी तुला 'नारायण बळी' व 'नागबळी' विधी करणे आवश्यक आहे. तसेच तुमचे घर तुमच्या बगलमध्ये असलेल्या इष्ट देवतेच्या (मारुतीच्या) गुढीपेक्षा उंच आहे शिवाय मूर्ती पण भग्न झाली आहे. घरापेक्षा देऊळ उंच बांध व त्यात नव्या मूर्तीची स्थापना कर, म्हणजे तुझी वंशवेल नक्की फुलेल.''

अवसराच्या सूचनेप्रमाणे बाप्पाने जुन्या देवळाचा जीर्णोद्धार करून उंच असे नवे देऊळ बांधले. त्यात मारुतीची नवीन सुंदर अशी मूर्ती स्थापन केली 'अभयमारुती' म्हणून ती मूर्ती प्रसिद्ध आहे. त्याचबरोबर बाप्पाने शास्त्रोक्त पद्धतीने 'नारायण बळी' व 'नागबळी' विधी पार पाडले. देऊळाच्या उजव्या बाजूला असलेल्या अंगणातील तुळशी वुंदावनात त्यावेळी नागमूर्तीची केलेली स्थापना, आजही सुस्थितीत आहे

देवळाच्या जीर्णोद्धाराचे काम पूर्ण झालेल्या वर्षीच आई गरोदर राहिली. एकदा घरी देवकार्य असताना कल्लो नारायण आमच्या घरी आलेले होते त्यावेळी त्यांच्या अंगात वारे आले आपणहून त्यांनी बाप्पाला बजावले, ''पहिले बाळंतपण या मठीवरच व्हायला हवे, तरच तुझी वंशवेल पुढे फुलेल, फळेल.''

पहिल्या बाळंतपणासाठी मुलगी माहेरी येणार म्हणून कंका अंकोल्यात सर्व तयारी करून बसली होती. कल्लो नारायणाच्या म्हणण्यानुसार बाळंतपण

कडवाडलाच होणार असल्यामुळे ती बाळंतपणासाठी तयार केलेले सर्व सामान घेऊन कडवाडला पोहोचली.

माझ्या जन्माला ३ आठवडे शिल्लक असताना अंकोल्याहून वाईट बातमी घेऊन एक गडी कडवाडला आला. माझ्या आजोबांना मधुमेहाची बीमारी होती.हजामाकडून दाढी करून घेताना त्यांना वस्तरा लागला होता. योग्य काळजी न घेतल्यामुळे झालेल्या जखमेचे सेप्टीक झाले व त्यांना भयंकर ताप चढला. त्यांचा अंतकाळ जवळ आल्याची सर्व चिन्हे दिसत असल्यामुळे बातमी घेऊन आलेल्या गड्याबरोबर कंका अंकोल्याला निघाली.ती अंकोल्याला पोहचली तेव्हा माझे आजोबा शेवटचे घटिका मोजत होते. ते बघून कंका तडक मागील दारी गेली व तिने तिथल्या बावडीत उडी घेतली. 'धप्प्' असा आवाज आलेला ऐकून कुणीतरी आरडाओरड केल्यामुळे माणसे बावडीकडे धावली. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे बावडीतील पाणी सुकून कमरभरच पाणी शिल्लक होते. बावडीतूनच कंकाने ओरडून आपण 'सती' जात असल्याचे सांगून कुणीही आपणाला वाचवायला येऊ नये असा इशारा केला व तिने पाण्यात निग्राहाने डुबकी मारली.

विहिरीतून बाहेर काढेपर्यंत कंका गतप्राण झाली होती.तेवढ्यात घरात आजोबांचे पण निधन झाले. त्यामुळे पती-पत्नीची एकत्र अंत्ययात्रा काढण्यात आली. व त्यांचे दहन पण एकाच चितेवर करण्यात आले. बाई सती गेली म्हणून अंकोला गावातील मोठा समाजसमूह त्या अंत्ययात्रेला व दहन विधीला हजर राहिला होता.(माझ्या 'बारा लेख' या पुस्तकात मी या गोष्टीची नोंद केली आहे.) ह्या घटनेमुळे माझ्या जन्माला दुःखाची किनार उमटली. माझ्या आजीची बहिण, केरेकट्टा येथील गंगामावशी,''तू आजी-आज्याला खाऊन जन्मला आहेस.'' म्हणून मला अनेक वर्षापर्यंत हिणवायची; त्याचवेळी आपल्या बहिणीचा नातू म्हणून माझे लाड पण करायची.

४

माझा जन्म झाला तेव्हा आई २० वर्षाची तर बाप्पा ३० वर्षांचे होते.दर तीन वर्षांच्या अंतराने माझ्या पाठीवर जान्हवी, रामानंद,कुमुद,आनंदराय व राधाकृष्ण अशी भावंडे जन्माला आली. आई कधी कधी वैतागाने पुढे गरिबीचे दिवस आले असताना म्हणायची,''वंशवेल नको तेवढी वाढली आहे.''

## जांबावली ते आंबीवली

आमचे गोत्र काश्यप. आम्ही गौड सारस्वत ब्राह्मण समाजाचे. गोव्यात पोर्तुगीजांनी बाटाबाटीचे सत्र जोरदारपणे सुरू केल्यानंतर आमचे पूर्वज गोव्यातील रिवण (ऋषीवन) भाग सोडून कुलदेव जांबावली येथील दामोदर देवापुढे २ असोले नारळ ठेवून, तेच नारळ प्रसाद म्हणून बांधून घेऊन रानवाटेने कर्नाटकातील काळी नदीवरील 'नायते' या गावी येऊन स्थायिक झाले. त्यावेळी शिकलेल्या कोणत्याही ब्राह्मणाला 'शेणै' (शेणवी) म्हणण्याचा प्रघात होता. आम्ही आडनावाने हेगडे असलो तरी आम्हांला आजूबाजूच्या गावातील लोक 'नायते वैले शेणै' अशी हाक मारायचे.

कडवाड हे गाव कारवार शहर भरभराटीला येण्याअगोदरचे बंदर व राज्यशासनाचे प्रमुख केंद्र. कडवाडला एक निपुत्रिक विधवा जमीनदारीण राहायची.तिचे घर डोंगराच्या पायथ्याशी होते. शिवाय आजूबाजूच्या गावांमधे बरीच शेती पण होती. घराजवळ मारूतीची पुरातन लहानशी गुडी होती. त्या विधवेच्या कजाग स्वभावामुळे कुणीही नातेवाईक तिला दत्तक मुलगा द्यायला तयार नव्हते. त्यावर उपाय म्हणून तिने नायते गावाहून अनंत शेणै-हेगडे यांना कडवाडला आमंत्रित करून दान म्हणून घर, घरामागील डोंगर व अन्य जमीन देऊन टाकली त्या बदल्यात तिने अनंत शेणै-हेगडे यांच्याकडून एक वचन घेतले, ते म्हणजे अनंत शेणै व त्यांचे वंशज मारूतीरायाची अखंड सेवा करतील. त्यानंतर नि:श्चिंत मनाने काही कालावधीतच तिने प्राण सोडला. अशा प्रकारे आमचे पूर्वज कडवाड या गावी स्थिरावले.

श्री मारूतीची पूजा करून व शेतीचे उत्पन्न मिळूनही घरखर्च व्यवस्थित चालत नाही म्हणून आमच्या पूर्वजांनी पौरोहित विधी शिकून घेऊन भिक्षुकीचा धंदा सुरू केला. त्यामुळे आमचे शेणैहेगडे हे आडनाव मागे पडून 'भट' हे आडनाव आम्हाला कायम चिकटले. माझ्या काही चुलत भावंडांनी हल्लीच भट आडनावाचा त्याग करून हेगडे आडनाव लावायला सुरूवात केलेली आहे.

पूजा-अर्चा व भिक्षुकी करीत असतानाच आमच्या वाडवडिलांनी संस्कृत भाषेत पांडित्य मिळवायला सुरूवात केली. काही जण कर्मकांड व काही जण ज्ञानकांड अशा दोन्ही क्षेत्रांत नावाजले गेले. माझ्या आजोबांनी घरी पाठशाळा काढली होती. त्यावेळी ४० मुले गुरूकुल पद्धतीने आमच्याकडे शिक्षण घेत होती असे मी वडीलधाऱ्यांकडून ऐकलेले आहे. पुढे अनंत भट यांच्या दोन

मुलांत वाद होऊन ते वेगळे झाले व त्याच प्रांगणात दुसरे घर बांधून राहू लागले.

आमचे घर डोंगराच्या उतारावर आहे म्हणून काही जण आम्हाला 'डोंगरेभट' म्हणून चिडवायचे. सध्या आमच्या दोन्ही घराण्यातील सर्वजण नोकरी धंद्यानिमित्त परगावी विशेषत: मुंबईत स्थिरावले आहोत. श्री मारूर्तीरायाच्या पूजेसाठी म्हणून आमचे शेजारी राहत असलेले श्री. गोपाळ प्रभू यांना नेमण्यात आले आहे. खासगी ट्रस्ट (न्यास) स्थापन करून मोठी रक्कम उभी करून त्या पैशातून मारूतीची दैनंदिन पूजा-अर्चा, अन्नाचा नैवेद्य व रामनवमी तसेच हनुमान जयंती सारखे उत्सव पार पाडले जातात. त्यासाठी आर्थिक तजवीज केली गेली आहे.

५

बारशे करून माझे नाव काय ठेवायचे याबद्दल शोधाशोध करण्याची गरज आईवडिलांना पडली नाही.कारण परंपरेनुसार माझ्या आजोबांचे नाव 'विठ्ठल' तेच मला ठेवण्यात आले. पण माझी आई व काकी (तिला आम्ही 'न्हेंनी' म्हणत होतो) यांना आपल्या सासऱ्याचे नाव घेण्याची मनाई होती.म्हणून बाप्पाने माझ्या नावापुढे 'राय' जोडून ''विठ्ठलराय''असे नामकरण केले. घरातील बायका व आजूबाजूचे लोक मात्र मला 'राया' म्हणूनच हाक मारायचे. त्यामुळे गावी व नातेवाईकांत मी अजूनही 'राया'म्हणूनच ओळखला जातो.

कर्नाटकातील हिंदूराजांचे विजयनगर साम्राज्य प्रख्यात होते. तिथले राजे आपल्या नावाच्या पुढे 'राय' ही पदवी जोडून घेत. उदा. कृष्णदेवराय, अच्च्युतदेवराय इ. तेव्हापासून कर्नाटकात नावाच्या पुढे 'राय' हा शब्द लावण्याची प्रथा रूढ झाली. जसे महाराष्ट्रात नावाच्या पुढे 'राव' ही पदवी लावली जाते. खरं म्हणजे राय किंवा राव हे शब्द राज या शब्दाचे अपभ्रंश आहेत. बंगालात पण राय नाव व आडनाव मोठ्या प्रमाणात प्रचलित आहे. त्यामुळे उत्तर कन्नड जिल्ह्यातील सर्व तालुक्यांमधून देवराय, आनंदराय, कृष्णराय, गणपतराय, अच्च्युतराय,बाबूराय इ. नावे भरपूर प्रमाणात आढळतात.

माझ्या जन्माच्या वेळी, घरची सांपत्तिक स्थिती बऱ्यापैकी होती. माझ्या कमरेला चांदीचा जाड करदोटा, पायात चांदीचे घुंगुरवाळे, हातात सोन्याचे वाळे, बोटात सोन्याच्या मुद्या (अंगठ्या), गळ्यात सोन्याची चैन व कानात सफेद खडे असलेले स्टार अशी माझी सजवलेल्या गणपतीच्या मूर्तीसारखी

अवस्था होती. पुढे गरिबीचे दिवस आल्यामुळे माझ्या भावंडांच्या नशिबी मात्र तशी चैन आली नाही.

बालपणी वजनाने मी जड असल्यामुळे आजूबाजूची मुले मला उचलून घ्यायला तयार नसत. उचलून घेतले तरी धप्प् करून टाकून देऊन पळून जात आमच्या घरासमोरच वरेरकर आडनावाचे कऱ्हाडे ब्राह्मणांचे घर आहे. गावातील लोक त्यांना 'काराडी भट' म्हणून ओळखायचे. त्या घरातील प्रमुख म्हणजे दत्तात्रय वरेरकर. त्यांना सर्वजण 'काराडी बाबू भट' म्हणून ओळखत. ते भूतपिशाच्च काढायचे म्हणून त्यांच्याकडे जवळपासच्या गावातील लोक 'बाधित' लोकांना घेऊन 'म्हारू' काढायला म्हणून येत असत. विशेषत: अमावस्या जवळ आली की अशी भूताखेताने पछाडलेली बरीच मंडळी घेऊन लोक त्यांच्या बागेत मुक्काम ठोकायचे. भूताखेतांना पळवून लावण्यासाठी म्हणून काराडी बाबू भट करत असलेले अघोरी विधी व मारहाण बघून आम्ही मुले थरथर कापायचो. काही मुले तर चळ् करुन मुतायची.

दत्तात्रय भटांच्या धाकटा मुलगा दिनकर हा माझ्यापेक्षा एका वर्षाने मोठा तर त्याची बहीण कमला ही तीन वर्षानी माझ्यापेक्षा मोठी होती. कमल अंगाने जाडजूड असल्याने मला उचलून घेऊन इकडे-तिकडे फिरत राहायची व मला वर उंच फेकून झेलून घेई.त्यामुळे कमल दिसताच मी तिच्याकडे आनंदाने झेपावत असे एकदा तिने माझा झेलचेंडू केला पण झेलताना तिचा अंदाज साफ चुकला व मी धडाम् करून खाली आपटलो माझी हनुवटी फुटून रक्तबंबाळ झाली माझे भोकांड ऐकून सर्वजण धावत आले.कोणीतरी जवळील देवळात जाऊन तिथे जमलेले जळमट (घैरांव) गोळा करून आणले व माझ्या हनुवटीला चिकटविले.पुढे तीन-चार दिवसांत ते जळमट लोंबू लागले व मी ऋषीकुमारासारखा दिसायला लागलो. आजही माझ्या हनुवटीला त्या जखमेचा वळ (माव) आहे.''हनुमानाचा भक्त म्हणून तुझी हनुवटी फुटली.''असे माझे मित्र चिडवायचे.त्या प्रकरणानंतर बरेच दिवस मी कमल दिसली की घरात पळून जायचो.

६

माझ्या जन्मानंतरचा पहिलाच गणपती उत्सव जवळ आला. नवसाचा म्हणून ५ .दिवसांचा गणपतीचा सण साजरा करायचा असं ठरलं.पहिल्याच

दिवशी रात्री पूजेच्या वेळी कुणीतरी पेटती फुलझडी (नक्षत्रांची कांडी) माझ्या हाती दिली. कुणीतरी माझा हात धरून फुलझडी फिरवताना माझ्या दोन्ही डोळ्यात त्याची गरम राख उडाली व मी आकांत मांडला. डोळे जबरदस्तीने उघडून त्यात गाईचे दूध घालत राहण्याचा सपाटा घरच्यांनी लावला. त्यावेळी आईने नवस केला,''रायाचे डोळे लवकर बरे होऊ दे. मी गणपतीला चांदीचे डोळे वाहीन.'' चौथ्या दिवशी मी जेव्हा डोळे उघडले तेव्हा घरातील सर्वांना आनंद झाला. ताबडतोब कारवारहून सराफच्या दुकानातून चांदीचे डोळे घडवून आणून ते गणपतीला वाहण्यात आले. विसर्जनाच्या दिवशी चांदीचे डोळे पण जलार्पण केले गेले.

दुसऱ्या वर्षी गणपतीच्या सणाच्या वेळी माझी एक सोन्याची मुदी हरवली. सगळीकडे शोधाशोध केली पण मुदी काही सापडली नाही. सर्वांनी ती अंगठी मिळण्याची आशा सोडून दिली होती. पावसाळा संपल्यावर आई एक दिवस अंगण झाडत होती तेव्हा काहीतरी चकाकले. उचलून बघते तर ती माझी हरवलेली मुदी होती. चार महिन्यांनी हरवलेली अंगठी मिळाली म्हणून त्या दिवशी देवाला (मारूतीला) पायसाचा गोड नैवेद्य दाखवण्यात आला.

मी साधारण ३ वर्षाचा झालो तेव्हा जान्हवी जन्माला आली. ठेंगणी ठुसकी, वजनाने हलकी व चाफेकळी नाकाची अशी ती गोरीपान होती. मी तिला लोंबकळवत घरभर फिरवत असे. आमचा वरांडा (चौकी) तीस फूट लांबीचा आहे. जान्हवी गुडघ्यावर उभी राहू लागली तेव्हा सायंकाळी आम्ही एक खेळ मांडित असू. चौकीच्या एका कोपऱ्यात आई, मी,नेन्ही (काकी) व होनी (वयनी) बसत असू. काही कळ काढून जान्हवीला चिडवताच ती धडाधड चौकीच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या उंबरठ्याजवळ जायची व त्यावर आपलं कपाळ कचाकच आपटून घ्यायची. मी मग धावत जाऊन तिच्या दोन्ही काखेत हात घालून ओढत तिला पूर्वस्थळी आणत असे. थोडं फुस लावल्यावर ती शांत होत असे. थोडी मोठी झाल्यावर तिला आम्ही मुद्दाम चिडवत आहोत हे समजलं व न रागवता कपाळ आपटण्याचा खेळ तिने सोडून दिला. पुढे माझी थोरली मुलगी (पद्मिनी) हिने आपल्या आत्याचा तो वारसा उचलला. ती पण लहान असताना कुणी चिडवलं की खाटेच्या खांबावर खटाखट कपाळ आपटून घ्यायची. आमच्या खोलीला उंबरठा नसल्यामुळे तिला कपाळ आपटून घ्यायला

अन्य साधन मिळत नसे.''आत्याची सवय (बड) तुला आली आहे.''असे मी पद्मिनीला चिडवायचो.

७

घरी गाई, म्हशी भरपूर होत्या. त्यामुळे दूध दुभत्याला काही कमी नव्हते. सकाळी तोंड धुतले की आई मला व जान्हवीला घेऊन गोठ्यात जायची. गरमागरम धारोष्ण दुधाचे फेसाळलेले लोटे ती आमच्या हाती द्यायची ते धारोष्ण दूध पिताना मिळणाऱ्या स्वर्गसुखाची याद आजही मनात रेंगाळते आहे. काही वर्षापूर्वी कोल्हापूरला गेल्यावेळी तिथे दुभत्या गाई व म्हशी दारात आणून लोकांच्या नजरेसमोर दूध देताना मी हॉटेलमधील खिडकीतून पाहिले. तात्काळ मी व बायको गवळ्याकडे गेलो. त्याला विनंती करून गरमागरम धारोष्ण दुधाचे पेले रिकामे केले व तृप्त झालो.

आमच्याकडे पाच-सहा गाई होत्या. त्यात 'सोमी' नावाची तांबूस रंगाची गाय, स्वभावाने गरीब व प्रेमळ होती. सोमवारी जन्मल्यामुळे तिचे नाव सोमी ठेवले होते मला ती फार आवडे. वेळ मिळेल तेव्हा मी तिला खाजवत असे. तिच्या अंगावरील गोचीड्या खेचून काढी. तेव्हा ती दोन्ही डोळे बंद करून, जीभ बाहेर काढून आरामात उभी राही. खाजवण्याचा कार्यक्रम संपल्यावर ती मला प्रेमाने चाटे तेव्हा अंगाला गुदगुदल्या व्हायच्या.

एक दिवस चरायला म्हणून सोडलेली सोमी अन्य गाई परतल्या तरी तिचा पत्ता नव्हता. सगळीकडे शोधाशोध सुरू झाली पण मध्यरात्रीपर्यंत काही तिचा पत्ता लागला नाही.दुसऱ्या दिवशी सकाळी कोणीतरी ती कडवाड ओहोळात (व्हाळ) उगवलेले पाणगवत खात उभी आहे, अशी बातमी आणली. माझे वडिल तीन-चार जणांना घेऊन गेले व सोमीला राजूने (दोरीने ) बांधून घरी आणले.ती घरी सुखरूप परतलेली पाहून आईने तिला कुंकू लावून पंचारतीने ओवाळले. माझा आनंद तर गगनात मावेनासा झाला. मी धावत जाऊन तिची गळाभेट घेतली, विहीरीतून पाणी आणून तिला साबण लावून आंघोळ घातली. त्या दिवशी दुपारी तिला गोडधोडासहित जेवणाचे पान देण्यात आले.

रामानंद जन्मला. तो माझ्यापेक्षा काळाकुळकुळीत दिसत असे वजनाने मात्र माझ्यापेक्षा तो हलका होता. त्यामुळे त्याला उचलून घेण्यात मला किंवा जान्हवीला अडचणीचे वाटत नव्हते.जन्मापासूनच त्याला पडसे,ओला खोकला

याचा त्रास होता.त्याचे नाक पिळून पिळून आम्ही सर्वजण हैराण व्हायचो. सर्व भावंडांत तोच जास्त मस्तीखोर असल्यामुळे तो सर्वांकडून मार खायचा.

श्रावण महिन्यात आई ''रविवार'' पुजायची. तिची पूजा चालू असताना एक दिवस रामानंदाने हट्ट करून भोकांड पसरले. कितीही समजावले तरी तो ऐकत नव्हता म्हणून आईने चिडून जवळील तांब्याचे फुलपात्र उचलून फेकून मारले. त्याच्या डोक्याला खोक पडून रक्ताची धार लागली. मी इकडून तिकडून जळमटे जमवून आणली व त्याची खोक भरली. त्या रात्री त्याला सडकून ताप भरला. दुसऱ्या दिवशी सकाळी त्याला कारवारला नेऊन कमलाकर डॉक्टरकडून इंजेक्शन देऊन आणले.

त्या काळी कमलाकर डॉक्टर म्हणजे संपूर्ण कारवार तालुक्यातील प्रख्यात डॉक्टर. लहान मुले व बायकांचा आजार बरा करण्यात त्यांचा हातखंडा होता. पुढे त्यांच्या मुलाने दवाखाना थाटला तेंव्हा त्याच्या नावाच्या बोर्डावर 'डॉक्टर कमलाकर यांच्या दवाखाना' असे मोठ्या अक्षरात लिहिलेले होते.

८

माझे थोरले काका (होडलो बाप्पा) यांना गणेशमूर्ती बनविण्याची आवड होती. आमच्या घरचा व आजूबाजूंच्या लोकांचे मिळून ते ८-१० गणपतीच्या मूर्ती बनवत असत. त्या काळी आताच्या सारखे साचे इत्यादी साधने नव्हती. चिकणमाती हातानी मळून एक एक अवयव बनवून ते धडाला चिकटवायचे. लहानशा खुरप्याने मूर्ती तासून त्याचे अंग तुकतुकीत करावे लागे. आम्ही एकूण कामे बारकाईने बघत बसून तासन्तास घालवत होतो. थोडे मोठे झाल्यावर गणपतीला 'बेस'(Base) म्हणून लावायचा चुना लावण्याची मला परवानगी मिळाली. बाकी सर्व रंगकाम होडलो बाप्पाच करीत असे. कधीकधी लहान उंदीर व वेटोळे घालून बसलेला नाग बनविण्याची परवानगी आम्हा लहान मुलांना मिळे. पुढे माझा सर्वात धाकटा बंधू राधाकृष्ण गावी असेपर्यंत गणपतीच्या मूर्ती बनवायचा.

चांगला शुभदिन पाहून आमचे कुलपुरोहित श्री. व्यंकटेश श्रीधर भट आमच्या घरी आले व मला जवळील मारूतीच्या देवळात घेऊन गेले. तिथे पाटीपूजा करून ''श्रीगणेशाय नम:'' हे शब्द हात धरून गिरवायला लावले. अशा प्रकारे विधीपूर्वक माझ्या विद्यारंभाला प्रारंभ झाला. गावाच्या दुसऱ्या

टोकाला भोईवाड्याजवळ राया पिंगे नावाचे मास्तर राहत होते. मी, गोविंद व प्रभाकर रोज पाट्या घेऊन त्यांच्या घरी जात असू. त्यांच्याकडे आम्ही कन्नड व मराठी बाराखडी शिकलो. पिंगे मास्तर स्वभावाने प्रेमळ होते. पण मध्येच कधीतरी कारण नसताना त्यांचा भडका उडे. त्यावेळी त्यांचा नाकाचा शेंडा व कानाच्या पाळ्या लाल होत असत. मग आम्हाला ते बडवून काढीत. आमची रडारड ऐकून त्यांची बायको शांती मध्ये पडून आमची सुटका करी व मग त्या दिवसाची शिकवणी संपे. त्यांना मुल-बाळ नव्हते. त्यामुळे नवरा बायको असमाधानी असत शांती मात्र लहान मुलांवर प्रेम करून, त्यांना खायला देऊन आपल्या वात्सल्याचा उमाळा शमवून घेई . मुलांना देण्यासाठी म्हणून ती वेगवेगळ्या प्रकारचे छोटे-छोटे लाडू बनवून ठेवीत असे.

नवीन शालेय वर्ष सुरू झाल्यावर मला ''मुलांची कन्नड शाळा'' या डोंगरावर असलेल्या ''बिन्नेत्ती'' (इयत्ता नसलेली) वर्गात दाखल करण्यात आले आमच्या घराशेजारी राहणारे गणपती मास्तर (श्री गणपती विठ्ठल प्रभू) यांनी दुसरी पर्यत शिकवले. रजा असलेल्या दिवशी आम्ही वाड्यावरील डझनभर मुले रस्त्यावर खेळत असू; त्यामुळे त्यांची झोपमोड होई. मग ते लपून छपून 'फोका' (शिपट्या) आणून आमंची पाठ सोलून काढीत त्या दिवसापुरता खेळ संपला तरी पुढील रजा आली की आमचा खेळ पुन्हा सुरू व्हायचा. पण सावधगिरी म्हणून आम्ही गणपती मास्तरांपासून लांब असलेल्या रस्त्याच्या कोपऱ्यात खेळायला जात असू. हेच गणपती मास्तर दर शुक्रवारी सायंकाळी एक ढब्बू पैसा देऊन कुणाला तरी गावातील 'कावाकां' (कावेरी आक्का)च्या दुकानावरून चणे आणायला पाठवायचे. मग सर्वांना चणे वाटप करून शुक्रवार साजरा केला जायचा.

आमचा तिसरी व चौथीचा वर्ग नंदनगद्दा या गावातील रायबाब मास्तर (जोशी) यांनी घेतला. ते आमच्या न्हेनीचे नातेवाईक असल्यामुळे सोमवार ते शुक्रवार आमच्या घरी असायचे त्यांच्यासाठी एक स्वतंत्र खोली देण्यात आली होती. शनिवारी दुपारी शाळा आटोपून ते आपल्या घरी जात ते थेट सोमवारी शाळेत येत असत या रायबाब मास्तरांच्याकडे हाताला बांधण्याचे सोन्याचे घड्याळ होते गावात असे घड्याळ अन्य कोणाकडेही नव्हते. त्यामुळे कुणी गावात बाळंत होण्याची वेळ जवळ आली की रायबाबमास्तर त्यांच्याकडून

घड्याळ मागून घेऊन जायचे. एका वाडग्यात ते घड्याळ ठेऊन देवासारखे जपून घरी नेले जाई. व काम आटोपल्यावर परत आणून दिले जाई. घड्याळात वेळ बघण्याची कला त्यांनीच आम्हाला प्रात्यक्षिकासहित शिकविली. रायबाब मास्तर काही कारणांनी गैरहजर असतील तेव्हा आम्ही अंगणात पडणाऱ्या सावलीच्या आधारे वेळ समजून घेऊन दुपारच्या शाळेत जायचो.

गणपती मास्तर व रायबाब मास्तर यांच्यावर हळगे येथील श्री मंजुनाथ प्रभू नावाचे गृहस्थ हेडमास्तर म्हणून काम करायचे. त्यावेळी मास्तरांना दरमहा आठ रुपये व हेडमास्तरांना बारा रुपये पगार मिळायचा. मंजुनाथ मास्तरांना वाड्यावरील विठोबा देवाळासमोर आपले बिऱ्हाड थाटले होते. त्यांचा मुलगा जयवंत हा 'मोना' (मुका) होता. तो बुद्धिने हुशार होता. पण त्याला बोलायला मात्र येत नव्हते. तो शारीरिक खाणाखुणा करून आमच्याशी संवाद साधायचा. त्याला लाळ आत गिळायला त्रास व्हायचा म्हणून एक मोठा रूमाल (टुवाल) जवळ बाळगायचा. एकसारखा तो टुवाल तोंडात घालून लाळ पुसायचा. त्यामुळे आम्हा अन्य विद्यार्थ्यांना शिसारी यायची. पण हेडमास्तरांचा मुलगा असल्यामुळे आम्ही काही करू शकत नव्हतो.

९

'न्हेनी' म्हणजे माझी काकी. ती विकेशी विधवा. सफेद नऊवारी साडी नेसायची व त्याच रंगाची चोळी घालायची. ती एकभुक्ता होती. ती रात्री फराळ करून वर दूध प्यायची. बहुतांश वेळा रात्रीला ती पापड व किसलेले खोबरे यांची ''किसमुर'' (पचडी) करायची. लहान मुलांना थोडी थोडी किसमुर दिल्याशिवाय ती खात नव्हती. ती लग्न होऊन आल्यावेळी आमच्या घरी संस्कृत पाठशाळा चालत असे.त्यामुळे ऐकून ऐकून व आल्यागेल्या विद्वानांची शास्त्राचर्चा ऐकून ती बहुश्रुत झाली होती. बोलताना ती पुराणातील अनेक दाखले चपखलपणे द्यायची व म्हणींचा अचूक वापर करी. तिच्यामुळे मला म्हणी गोळा करण्याचा छंद जडला. पुढे ''बहुभाषिक समानार्थी इंद्रधनुषी म्हणी'' नावाचे पुस्तक प्रकाशित केले. तेव्हा ते पुस्तक मी आठवणीने न्हेनीला अर्पण केलेले आहे.

न्हेनी छान छान गोष्टी सांगायची. नंदनगद्दा व कोडीबाग येथे राहणाऱ्या आनंद्याक्का व कुक्याका या नावाच्या तिच्या बालमैत्रिणी आमच्या घरी राहायला

यायच्या. त्या दोघीपण तिच्यासारख्याच विकेशी विधवा होत्या. दर उन्हाळ्यात पापड, वड्या(कुरडया), लोणची इत्यादी करायला पंधरा-वीस दिवस न्हेनीकडे राहायला यायच्या. त्या दोघीजणी न्हेनीच्यापेक्षा सुंदर व सरस गोष्ट्या सांगायच्या. कुक्याका तर मधून मधून आपल्या सुंदर आवाजात गाणी व भजने म्हणत असे. त्यांच्यापैकी कोणीही आमच्या घरी आले की मी व जान्हवी न बोलावता आपापल्या वळकट्या घेऊन न्हेनीच्या घरी पडाव टाकायचो. त्या दोघींजणी परत जाईपर्यत आमचा रात्रीचा मुक्काम न्हेनीकडे ठरलेला असे.

न्हेनी मूडमध्ये असली की आम्हाला ती तिच्या अनेक मनोरंजक आठवणी सांगायची. तिची एक आठवण अतिशय मजेदार होती. तिच्या लहानपणातील ती आठवण आहे. म्हणजे, साधारण १०० वर्षापूर्वीची. तेव्हापर्यंत आमच्या गावी मोटारकार आलेली नव्हती. लोकांनी,'' चार चाकावर धावणारी बैल नसलेली गाडी म्हणजे मोटारकार'' हे ऐकलेले होते त्यामुळे सर्वांना कार बघण्याची उत्सुकता लागून राहिलेली होती. एकदा कलेक्टरसाहेब गाव तपासणीसाठी कारमधून येणार असल्याचा निरोप आला. त्यांचे वेशीवर स्वागत करण्यासाठी म्हणून गावच्या पाटलाने वाजंत्री व काही प्रतिष्ठितांना घेऊन सीमेवर मुक्काम ठोकला होता. उत्सुकतेपोटी गावातील झाडून जवळजवळ सर्व लोक तिथे जमा झालेले हाते.

कलेक्टरसाहेबांची कार लांबून दिसल्याबरोबर पाटलाने वाजंत्र्यांना वाजवायला सांगितले. त्यांनी वाजवायला सुरूवात केली खरी पण कार जवळ यायला लागली तेव्हा घाबरून वाद्य टाकून ते सर्वजण माकडासारखे आजूबाजूंच्या झाडावंर चढून बसले अन्य माणसे शेतावावरात व रानावनात पळून गेली. पाटील महाशय तेवढे हातात हार घेऊन उभे होते त्यांनी दुभाष्यांच्या मार्फत घडलेली गोष्ट जेव्हा इंग्रज कलेक्टर साहेबांना सांगितली तेव्हा त्यांची हसून हसून मुरकुंडी वळली त्यांनी आपल्यासोबत असलेले शानभोग (तहसीलदार) मामलतदार व संरक्षणासाठी असलेल्या पोलिस शिपायांना लोकांना बोलावून आणायला सांगितले तहसिलदाराने लोकांना कार कशी चालते हे समजावून सांगितल्यावर सर्वांना धीर आला. काही जणांनी भीत-भीत कारला हात लावून पाहिला. ती लात - बीत मारत नाही असे बघितल्यावर इतरांनी त्यांचे अनुकरण केले कुणीतरी नारळ आणून फोडला. सुवासिनीनी हळद कुंकू लावून गाडीची पूजा केली. मगच गाडी गावात शिरली. ही गोष्ट आम्ही अनेकवेळा ऐकली असली

तरी न्हेनीच्या रंगवून सांगण्याच्या पद्धतीमुळे आम्ही ती गोष्ट परत परत ऐकून मनमुराद हसत असू.

न्हेनीला कीर्तन ऐकण्याचा व यक्षगान (दशावतार) खेळ पाहण्याचा नाद होता. आमच्या गावात किंवा आजूबाजूच्या गावात कीर्तन असले की ती मला बखोटीला धरून घेऊन जायची.त्यामुळे मला कीर्तन ऐकण्याचा नाद लागला. कऱ्हाडकर नावाचे बुवा सुंकेरी गावातील नवरात्र उत्सवात दहा दिवस सलगपणे कीर्तन करायचे. त्यांना विशेष बिदागी देऊन खास पुण्याहून बोलावले असायचे. हार्मोनियमवर त्यांचा मुलगा व धाकटा भाऊ तबल्यावर त्यांना साथ करीत असत.

जेवणखाण बनविण्यासाठी कऱ्हाडकरांचे पत्नी आलेली असायची. आपल्या कीर्तनाच्या दरम्यान कऱ्हाडकर अनेक दृष्टांत द्यायचे व योग्य ठिकाणी तालासुरात शास्त्रीय संगीतातीलं. नाट्यपदे पण सादर करायचे. गावी असेपर्यंत न चुकता दरवर्षी मी कऱ्हाडकरांचे कीर्तन ऐकून तृप्त झालेलो आहे.

वृद्धापकाळामुळे कऱ्हाडकर बुवांना पुण्याहून सुंकेरीपर्यंत मजल दरमजल करीत पोह्चणे जेव्हा अशक्य झाले तेव्हा पुणे येथील कीर्तन संस्थेच्या मार्फत आफळे नावाचे कीर्तनकार सुंकेरीला आले. ते हिंदू महासभेचे आक्रमक असे कार्यकर्ते होते. त्यामुळे त्यांचा कल पौराणिक कथानकांच्यापेक्षा ऐतिहासिक कथानकांवर जास्त होता. त्यामुळे ते शिवाजी महाराज, राणाप्रताप, राणी लक्ष्मीबाई यांच्यासारख्या ऐतिहासिक नररत्नांची आख्याने सजवित. कीर्तन संपल्यावर पारंपारिक घोषणांच्या बरोबरच हिंदू धर्माच्या विजयाच्या पण घोषणा देत. त्यावेळी सुंकेरी व आजूबाजूच्या भागातील लोकांच्यावर काँग्रेसचा पगडा जास्त प्रमाणात होता. त्यामुळे बुवा उत्तम रितीने वीररसपूर्ण कीर्तन सादर करीत असले तरी त्यांच्यावर राजकीय कारणामुळे काही श्रोते नाराज होते. एक दिवस निरूपणाच्या भरात काँग्रेसवर टिका करता करता त्यांनी पंडीत जवाहरलाल नेहरू हे दररोज गोमासांचे पदार्थ (Beef) आवडीने खातात असे सांगून वातावरण तापविण्याचा प्रकार केला. त्याबरोबर काही श्रोत्यांनी उभे राहून आफळे बुवांचा तिथल्या तिथे निषेध केला. साहजिकच त्या दिवसाचे कीर्तन अपक्षेइतके रंगले नाही. काही गावातील वजनदारं मंडळी दुसऱ्या दिवशी सकाळी कारवार येथील कलेक्टर साहेबांच्या बंगल्यावर जाऊन धडकली. त्यांनी तिथ आफळे

बुवांच्या विरूद्ध चुगली केली. लागलीच एक पोलिस जीप सुंकेरीला येऊन आफळे बुवांना घेऊन गेली. त्यांना जिल्हा पोलिस अधीक्षकांनी राजकीय व सामाजिक त्वेष वाढेल अशा प्रकारचे कीर्तन न करण्याबाबत ताकीद दिली. राहिलेले दिवस कीर्तन करून आफळे बुवा जे पुण्याला परतले, ते पुन्हा कधीच सुंकेरीला वापस आले नाहीत.

आफळे बुवांचं प्रकरण झाल्यानंतर यापुढे स्थानिक लोकांकडूनच कीर्तन करून घ्यावे असे संचालकांनी ठरविले. त्यामुळे सुंकेरी येथील श्री बालमुकुंद आचार्य कीर्तन करू लागले. बाड येथील स्कूलमध्ये इंग्लिश शिकविणारे श्री. कृष्ण विष्णू सावकार शिक्षक तबला वाजवित व शेजवाड येथील श्री शांताराम शेजवाडकर पेटीवर साथ करीत असत.

१०

कुमुद जन्माला आली. ती गोरी गोबरी व अंगाने जाड होती. त्यामुळे तिला सहजपणेउचलून घ्यायला मला जमत नसे. काखेत हात घालून फरफटत आम्ही मुले तिला इकडून तिकडे नेत असू. हसली की तिच्या उजव्या गालावर छान खळी पडत असे. तिची ती खळी वारंवार पाहाता यावी म्हणून आम्ही तिला गुदगुल्या करून हसवत असू. मग आई बडबड करून, पाठीत धपाटे घालून आमचा हा खेळ बंद पाडी व मगच कुमुद आमच्या तावडीतून सुटे.

ब्राह्मण वाड्याच्या एका टोकावर विठोबाचे मंदिर आहे. तिथे दरवर्षी कार्तिकी एकादशीचा सोहळा व त्याच्या दुसऱ्या दिवशी दहीकाला असे कार्यक्रम होतात एकादशीच्या रात्री जागरण व्हावे म्हणून कोकणी, मराठी किंवा कन्नड भाषेतील नाटक ठेवले जाई कधी कधी यक्षगान(दशावतार)हा खेळ पण ठेवलेला असे. त्या खेळात राक्षसाचे पात्रे-उदा रावण, कुंभकर्ण, शंकासूर यांचा प्रवेश जवळ आला की वाद्यांचा जोरदार गजर केला जाई फटाके व गरनाळे यांची रोषणाई होत असे मोठमोठ्यानी आरोळ्या ठोकित चित्रविचित्र रंगभूषा व आक्राळ-विक्राळ मुखवटे धारण केलेली पात्रे मैदानात प्रवेश करीत त्यावेळी आयांच्या मांड्यावर झोपलेली लहान बाळे किंचाळून उठत व मोठ्मोठ्याने भोकांड पसरत.

विठोबाच्या देवळाच्या स्थापनेविषयी एक कथा सांगितली जाते. देसाई घराण्यातील एका वृद्ध म्हातारीला पंढरपूरची एकदा तरी वारी करावी अशी इच्छा होती. तिच्याकडे वंशपंरपरागत असा सुंदर दिसणारा लामणदिवा होता.

तो लामणदिवा पंढरीला नेऊन विठुरायाला अर्पण करावा अशी तिची इच्छा होती. ती आसन्नमरण झाली तेव्हा तिला एकसारखा त्याच गोष्टीचा ध्यास लागला. एका रात्री तिला दृष्टांत झाला. पांडुरंगाने तिच्या स्वप्नात येऊन ''मी या वर्षी कार्तिकी एकादशीला इथल्या देवळातील विठोबात तुला दर्शन देईन. तेव्हा तू लामणदिवा मला तिथेच अर्पण कर.'' ही गोष्ट घरातील व आजूबाजूच्या लोकांना समजली तेव्हापासून तिथे जत्रा भरू लागली. ठरल्या दिवशी तो लामणदिवा विठोबाला अर्पण करण्यात आला. तिच्या मुलाने तो लामणदिवा पेटवून मंदिराच्या बाहेर आणून जमलेल्या सर्व भक्तांना दाखवला. तेव्हा हर्षभराने सर्व भक्तानी विठूनामाचा  गजर केला. आजही तो लामण दिवा पेटवून कार्तिक एकादशीच्या दिवशी भक्तांना  उंचावून दाखविण्याची प्रथा चालू आहे. पूर्वी देसाई घराण्यातील वंशज येऊन हा विधी पार पाडत असत. आता त्या घराण्यातील माणसे नोकरी व्यवसायानिमित्त बाहेरगावी गेल्याने मंदिराचे पुजारी लामणदिवा पेटवून, वाद्याच्या गजरात मंदिराला प्रदक्षिणा घालून तो लामणदिवा एका ठराविक ठिकाणी आणून ठेवतात.

काही वर्षांनी गावातील विविध भागातून भजनीमंडळी दिंड्या घेऊन मंदिरापर्यंत येण्याची टूम निघाली. घुमटां, समेळ व टाळ मृदुगांच्या गजरात विविध भागातून दिंड्या, भजन करीत गॅसबत्तीच्या उजेडात  विठोबा मंदिराजवळ येत. त्या सर्व मेळ्यात महालेवाड्यावरून येणारी दिंडी फार गाजलेली होती. कारण श्री व्यंकटेश महाले नावाचे न्हावी अतिशय सुस्वर आवाजात भजने गात असत. आता अशा वारकरी दिंड्या येण्याचे प्रकार थांबले आहेत.

विठोबा मंदिराशेजारी दत्ताचे मंदिर आहे.तिथे दरवर्षी दत्तजयंतीचा उत्सव मोठ्या प्रमाणात साजरा केला जातो.त्यावेळी भक्तांनी आणून दिलेली फुले,फळे,भाज्या इ.तेथे जाहीर लिलाव केला जातो.लिलावातील वस्तू आपणालाच मिळावी म्हणून जमलेल्या लोकात चढाओढ निर्माण होते.सर्वात जास्त जो बोली लावील त्याच्या मालकीची ती वस्तू होते. त्यामधून काही वेळा वैरभाव निर्माण होऊन नंतर मारामाऱ्या पण झाल्या आहेत. आता अशा प्रकारे लिलाव पुकारून देवास्थानासाठी निधी उभारण्याची प्रथा सररसकटपणे प्रचारात आली आहे.

कडवाड गाव संपल्यावर किन्नर गावाकडे जाणारा रस्ता लागतो. जिथे कडवाड गावाची सीमा संपते तिथे ''वाघऱ्याचे देऊळ '' आहे. त्या देवळात

मूर्ती अशी नसून मातीच्या अनेक आकारांचे वाघाचे मुखवटे ठेवलेले आहेत. गर्भगुडीत मोठमोठी वारूळे आहेत. त्यातून सापांची वस्ती आहे. त्या देवळाचा दरवाजा कधी बंद केला जात नाही. आदिवासी लोकांनी अनेक शतकांच्या मागे बांधलेले ते ओबडधोबड वाघांचे देऊळ आता पक्के बांधून काढले आहे. त्या देवळाला लागूनच एक सुंदर , शुद्धपाण्याचा झरा वाहत असतो. वर्षातून एकदा हिवाळ्यात व्यंकटरमण देवाची पालखी घेऊन ब्राह्मण वाड्यातील लोक वन भोजनाची सहल काढतात तिथे झाडांच्या खाली बसता यावे म्हणून जागा समतोल करून दगडी ओटे बांधले आहेत. प्रत्येक घरातून ठरलेली शिधासामुग्री आणून जेवण बनविले जाते.त्यावेळी पुरुष मंडळी हास्य विनोदात व लहान मुले खेळ,मारामाऱ्या करण्यात वेळ घालवीत असत. सायंकाळी वाजत गाजत देवाची पालखी घेऊन सर्वजण गावी परतत. अशा प्रकारे वनभोजनाचा सोहळा पार पडे. आता हा सोहळा बंद पडलेला आहे.

वनभोजनाप्रमाणेच दरवर्षी दसऱ्याची पालखी गावाबाहेरील वाघरू देवळापर्यत नेली जाई. तिथे आपट्याच्या झाडाची पूजा करून सोने म्हणून आपट्याची पाने घरी आणली जात. त्याला ''शिलंगणाचे सोने लुटणे'' असे म्हणतात. त्यादिवशी घरोघरी शस्त्रपूजा केली जाते. त्या अगोदर नवमीच्या दिवशी घरातील पुस्तकांची पूजा करून शारदोत्सव साजरा करीत असत. आता या प्रथा बंद झालेल्या आहेत.

११

माझ्या घराजवळील मठात दरवर्षी चार दिवसांचा रथोत्सव जोरदारपणे साजरा केला जाई. रथसप्तमी व अष्टमीच्या दिवशी तीन-तीन उत्सव साजरे केले जातात अगोदर 'लालकी', मग खांद्यावरून वाहून नेणारा 'गरूडरथ' व शेवटी सजवलेला रथ ओढून विठोबाच्या देवळापर्यत नेला जातो व परत मठापर्यंत ओढत आणला जातो. नवमीच्या दिवशी एकच उत्सव म्हणजे 'मोठा रथ'. त्या दिवशी आजूबाजूच्या गावातून आलेल्या हजारो लोकांना अन्नदान केले जाते.पहिले दोन दिवस ओढल्या जाणाऱ्या रथाला ''लहान रथ'' असं म्हटल जातं. कारण तो आकाराने लहान असतो. ''होडालो रथ'' (मोठा रथ) हा चारमजली उंच असा रस्सीच्या मदतीने बांधला जातो.त्यात रंगीबेरंगी अशा हजारो पताका खोवल्या जातात.शेवटी पितळेचा चकाकणारा असा कलश स्थापन केलेला

असतो. त्या दिवशी जागरण व्हावं म्हणून नाटकाचा खेळ किंवा यक्षगानाचा खेळ ठेवला जाई. मग पहाटेच्या दरम्यान रथोत्सव ''व्याकटरमण गोविंदा गोविंदा''या गजरात हजारो भक्तगण तो ओढून विठोबा देवळापर्यंत नेतात व मग परत मठापर्यंत ओढत आणतात. त्यावेळी अपघात वगैरे होऊ नये म्हणून विशेष पोलिस बंदोबस्त ठेवला जातो. साधारण जगन्नाथपुरी येथील रथोत्सवासारखाच हा उत्सव असतो. पण सौंदर्याच्या व डौलदारपणाच्या बाबतीत कडवाड येथील मोठा रथ जास्त नेत्रसुखद आहे. दुसऱ्या दिवशी सायंकाळी ''ओकळी'' नावाचा उत्सव असतो.त्या दिवशी मोठी जत्रा भरते.आजूबाजूच्या गावातील हजारो मंडळी जत्रेचा आनंद लुटण्यासाठी येतात. ओकळीचा कार्यक्रम म्हणजे ब्राह्मण वाड्यावरील पाच विहिरींचे पाणी वाजत गाजत आणून मठाच्या अंगणात ठेवलेल्या मोठ्या ''पंचांडींत'' ठेवले जाते.डोक्यावर भरलेल्या पाण्याचा कलश घेऊन एक माणूस येत असतो.त्या मिरवणुकीत लहानथोर सर्व मंडळी आनंदाने सहभागी होतात. सर्वांच्या गळ्यात फुलांच्या माळा घालतात व गुलाल उधळवत ही मिरवणूक जाते.त्या वेळेचा वाद्याचा गजर हा रणवाद्यांसारखा असतो.त्यामुळे सर्वजण बेहोषपणे नाचतात. लहानपणी आम्ही सर्वजण त्यात आनंदाने व उन्मादाने भाग घेत असू.

पाच बावड्यांचे पाणी एकत्र झाल्यावर पंचांडीत मुख्य पुजारी त्या पाण्यात गुलाल मिसळतात. अगोदर उत्सवमूर्तीवर गुलालपाणी शिंपडून मग जमलेल्या सर्व लोकांवर ह्या रंगीत पाण्याचा शिडकावा केला जातो. मग काही हास्य-करमणुकीचे खेळ सादर केल्यावर देवाची पालखी उचलली जाते. गावाच्या बाहेर असलेल्या मारूती देवस्थानाकडे आंघोळीसाठी म्हणून पालखीसह सर्वजण वाजत गाजत निघतात. मारूतीच्या देवळापुढील तळ्यात देवाला आंघोळ घालून झाल्यावर अन्य भक्तगण त्या तलावात उड्या मारून आंघोळ करतात. मग पालखी वाजत गाजत परतते. त्यावेळी प्रत्येक घरापुढे आंब्याच्या पानांची तोरणे लावलेली असतात व पालखीला मानाची आरती केली जाते. त्या रात्रीच्या पालखीला ''दशमीची पालखी'' असे म्हणतात. रात्री गावजेवण असते. त्या रात्रीच्या जेवणाचा व त्या दिवसाच्या उत्सवाचा खर्च आमच्या घराण्यातून केला जातो. पूर्वी त्यासाठी जमीन सोडलेली होती. आता ती जमीन कुळकायद्याप्रमाणे रयताच्या नावी झाल्यामुळे मठाला उत्पन्न मिळत नाही. त्या खर्चाचा समभाग मी व माझा पुतण्या प्रेमानंद अजूनपर्यंत करीत आलेलो आहोत.

## १२

गावात होणारे धार्मिक उत्सव व घरोघरी होणारे सण याशिवाय आम्हा मुलांचे काही करमणुकीचे कार्यक्रम असत. त्यातील बहुतांश खेळामध्ये आम्ही बाळ-गोपाळ मंडळी सहभागी होत असू. विटी-दांडू, लगोरी, लपाछपी, चोरपोलिस, नवराबायको, चेंडूफळी, लंगडी, खो-खो इ. खेळ खेळत असू. उन्हाळ्यात काजूच्या असोली बिया घेऊन अनेक तऱ्हेचे खेळ खेळत असू. ग्रामदेव असलेल्या महादेवाच्या देवळापुढे भलेमोठे वडाचे झाड होते. तिथे आम्ही सूरपारब्याचा खेळ खेळत असू. त्या वडाच्या झाडाखाली आम्ही मुलांचे वनभोजन साजरे करीत होतो. प्रत्येकाने आपल्या घरातून काहीतरी खाऊ आणून वडाच्या पानांच्या पत्रावळी, द्रोण तयार करून आम्ही सहभोजनाचा आनंद लुटत असू. लहानशी पालखी तयार करून त्यात एक धोंडा 'देव' म्हणून ठेवून वडाच्या झाडाला पाच प्रदक्षिणा घातल्यावर हा समारंभ संपे.

घरामागे आमच्या मालकीचा मोठा डोंगर आहे.त्या जागेत फणस,आंबे, जांभूळ, भिरंडा(कोकम) अशी पुष्कळ झाडे आहेत.त्यामुळे उन्हाळ्यातील चार महिन्यात आमचा मुक्काम डोंगरावरच पडलेला असायचा. खेती (लाल तोंडाची माकडे), चानी (खारूताई), आदी प्राण्यांची नजरभेट होई. कधी कधी मोठ्या माकडाचा कळप (त्यांना 'हुप्या' म्हणत)आमच्या अंगावर चवताळून येई.आम्ही त्यांना दगड मारले तर तेच दगड झेलून ते आमच्यावर भिरकावीत.तोंडे वेडीवाकडी करून मोठमोठ्याने ओरडून माकडे आम्हाला पकडायला धावून येत.

उन्हाळ्याच्या सुटीत आंबे, फणस, काजू, कोकम व जांभळाच्या शिवाय नाना प्रकारचा रानमेवा मिळत असे. करवंदे, पिटकुळा, जांब, चुरणा, चारा व चिवरा इ. मुबलक मिळत असत. रोज सायंकाळी रानमेवा मिळवून खाण्याच्या कार्यक्रमासाठी आम्ही डोंगरावर लांब लांब पर्यंत जात असू. एकदा असेच रानात दूर गेल्योवळी एक वाघरू आडवे आले. सर्वांनी बोबाबोब करून हाकलले म्हणून आम्ही बचावलो. त्या दिवशी घरी पोहचेपर्यंत अनेक जणांच्या चड्ड्या पिवळ्या झालेल्या होत्या.

लहानपणी आमच्या वाड्यावर भरपूर मुले होती. दिनकर, गोविंदण्णा माधव, पुतुराय (राजाराम), विठू, रमाकांत, खळू, श्रीकांत, जयवंत, प्रभाकर, गोविंद, मुरली, मोहन, वसंत उपेंद्र (उपी) व मी असे जरा वयस्कर गटातील मुले

होती. त्यानंतरच्या फळीत –रामानंद, प्रेमानंद, रामकृष्ण, वासुदेव, अशोक, रोहिदास, सुरेश (वर्टी), भाला, कृष्ण, सुरेश (कसबेकर) अशी मुले होती. आमची समवयस्क मुली म्हणजे माझ्या बहीणी जान्हवी व कुमुद तसेच रेवती, गोदावरी, विजया, बेबी, सुमन, शालिनी, पुष्पा इ. मुलामुलींचा असा संयुक्त खेळ होत नसे. फक्त पावसाळ्यात मात्र सागरगोटे, गजगे, ताबूलफळी, गुडफळी, इ. खेळ मात्र मुलंमुली एकत्रितपणे खेळत असू.

आम्ही जरा मोठे झाल्यावर बहुतांश जण पुढील शिक्षणासाठी बाड येथील न्यू इंग्लिश स्कूल मध्ये दाखल झालो. फक्त दिनकर मात्र कारवारच्या शाळेत दाखल झाला. तो रोज सायकलीने ये–जा करीत असे. कारवारला असताना दिनकरला इतर मुलांच्या नादाने सिगारेट ओढण्याची सवय लागली. एक दिवस तो पिवळ्या हत्तीचे पाकीट (Honey dew) घेऊन काही मुलांना सोबत घेऊन दूर डोंगरावर गेला व सिगारेट ओढण्याची दीक्षा दिली. पहिल्यांदाच झुरका मारल्यानंतर माझ्या डोळ्यातून पाणी आले व खोकल्याची ढास लागली. सायंकाळी घरी परतलो तेव्हा आईला माझ्या तोंडाला सिगारेटचा वास आला. तिने मला यथेच्छ बडवून काढले. दुसऱ्या दिवशी वडिलांना सांगितल्यावर मला परत एकदा जोरदारपणे फटके मिळाले. तेव्हापासून मी सिगारेट ओढण्याचे सोडून दिले. पुढे मुंबईत स्थिरावल्यावर काही वर्षांनी मला सिगारेटचे व्यसन लागले. साधारण वीस वर्षे सलग असे अग्नीहोत्र चालले. दोन वर्षांपूर्वी वारंवार सुका खोकला सुरू झालयावर मी सिगारेट ओढण्याचे कायमचे बंद केले. इच्छा असली तर व्यसनमुक्ती साध्य करता येते.

कडवाड येथील शाळेत शिकत असताना रोज सकाळी ''भो ऽ, पंचम जॉर्ज भूप'' ही प्रार्थना आम्हाला म्हणावी लागे. त्यावेळी आमचा देश ब्रिटिशांच्या गुलामगिरीत असल्यामुळे ही प्रार्थना सर्व शाळांतून सक्तीने म्हणावी लागे. देशात स्वातंत्र्य चळवळीचे वारे जोरात वाहत असल्यामुळे नागरिक, शिक्षक व विद्यार्थ्यांमध्ये इंग्रजांच्या विरूद्ध तिरस्कारची भावना उफाळून येत होती. आमच्या शाळेतील शिक्षकांना पण ही प्रार्थना शिकविणे नापसंत होते. पण ते काय करणार? सरकारी हुकूम पाळणे त्यांच्यावर बंधनकारक होते. आमची शाळा गावापासून फार लांब, उंच डोंगरावरील पठारावर होती. देशभक्तीचे स्फुरण अंगात आल्यावेळी शिक्षक आम्हाला हळू आवाजात ''वंदे मातरम्'' हे गीत

शिकवीत असत. हे गीत संपल्यावर दरवेळी ''घरी गेल्यावर शाळेत आज ''वंदे मातरम्'' म्हणायला शिकविले होते हे सांगायचे नाही.'' अशी जबरीची ताकीद दिली जायची.

उन्हाळ्याच्या सुट्टीत गावात ''भांड'' नावाचा एक उत्सव गावी पार पडतो. आमच्या सरकारी कन्नड शाळेच्या उतारावर ''गुनगी'' नावाची आदिवासी जमात राहते. त्यांचं देवीचं लहानसं असं देऊळ आहे. त्या देवळात पितळेचा एक मोठा कलश ठेवलेला असतो. त्याला पकडायला चहाच्या किटलीला असते तशी तोटी असते. त्यात लोखंडाच्या गजांचा एक साचा ठेवलेला असतो. त्याला भरपूर फुलांच्या माळा घालून सजवितात. त्याला पितळेचा एक देवीचा मुखवटा बांधलेला असतो. पितळेच्या त्या मोठ्या किटलीत भरपूर तांदूळ भरून तो लोखंडाचा साचा त्यात रोवला जातो. त्या कलशाची मग रोज गंधफुल वाहून पूजा केली जाते.

वैशाख महिन्यात अक्षय तृतीयेच्या दिवशी यथासांग पूजा करून मंदिरातून तो कलश बाहेर काढला जातो. रोज रात्री ठराविक घरातील ज्येष्ठ मुलगा डोक्याला भली मोठी चुंबळ बांधून तो कलश डोक्यावर घेतो. त्या कलशाच्या आगे-मागे दहा-बारा मानकरी-गावपाटील, ग्रामजोशी, ग्रामदेव महादेवाचे मक्तेसर व अन्य लोक चांदीच्या काठ्या कमरेवर धरून चालत असतात. त्या चांदीच्या काठ्यांना 'कटका' असे म्हणतात. वाजंत्र्यांच्या गजरात अंगात अवसर आल्यासारखे कलश धरलेले व अन्य मानकरी उंच डोंगरावरून उतरुन धावत गावात प्रवेश करतात.

मशाली, हिलाल व माडांच्या सुकलेल्या चुडत्यांचे (झावळ्या) पेटते टेंभडे मिरवत ही मिरवणूक ग्रामदेवाच्याकडे येते. देवळापुढील पिंपळाच्या पारावर या कलशदेवाला बसण्यासाठी म्हणून विशेष स्वरूपाची दगडाची गुडी बांधून ठेवलेली आहे. नंतर त्या पारापुढील मोकळ्या मैदानात काहीजण लाकडी मुखवटे चढवून नाना तऱ्हेचे विडंबनात्मक खेळ करून दाखवतात. त्यात गेल्या वर्षभरात गावी झालेल्या भानगड्यांच्या कथा (खरी नावे बदलून) केल्या जातात. त्या खेळाला ''आडू खेळ'' असे म्हणतात. मग तो कलश उचलून आल्या वाटेनेच [illegible] गाजत सर्वजण नेतात. अशा प्रकारे हा कार्यक्रम सात दिवस चालतो.

आठव्या दिवशी कलश विशेष रूपाने सजवून त्यावर जरतारी कपडा बांधून कलश महादेवाच्या देऊळापर्यंत आणला जातो. देऊळाला सर्वजण पाच प्रदक्षिणा घालून कलश घेऊन देऊळामागच्या शेतात जातात. तिथे तो कलश लाकडी चार चाकांच्या चौरंगावर स्थापन केला जातो. त्यांच्यापुढे गावातील लोक आपल्या नवसाप्रमाणे नारळ (१ ते २१) फोडतात. काहीजण कोंबड्या कापतात. सर्वसाधारणपणे ब्राह्मण व सोनार समाजातील लोक सोडल्यास, अन्य जातीतील लोक न चुकता घरट्यामागे किमान एक तरी कोंबडा किंवा कोंबडी कापतात. त्या दिवशी रात्री गावातील लोकांचे सगेसोयरे पाहुणे म्हणून येतात. कारण त्यांना कोंबडीच्या मटणाचे जेवण मिळणार असते. आमच्या गावी मटणाला 'शागोती' व कोंबड्याला 'कुकड' असे म्हणतात. कुकड हा संस्कृत भाषेतील 'कुक्कुट' या शब्दाचा अपभ्रंश आहे.

या सणाला ''भांडी''चा सण असे म्हणतात. कानडी शब्द 'बंडी हब्ब' (गाडीचा सण) या नावावरून ''भांड'' हा शब्द प्रचलित झालेला आहे. अशा प्रकारचे भांडीचे सण उत्तर कर्नाटकातील खेडोपाडी दरसाल मोठ्या उत्साहाने साजरे केले जातात. लोकांना वेगवेगळ्या गावांतील भांडी ''परबेला'' (सणाला) जाता यावे म्हणून या सणाचे एक वेळापत्रक परंपरेने तयार झालेले आहे. त्यानुसार साधारण तीन महिन्यांच्या अवधीत हे सण वेगवेगळ्या दिवशी पार पडतात. बाहेर गावी असलेला समाज मोठ्या प्रमाणात या सणाला मुद्दाम गावी येऊन हजेरी लावतात. काही ठिकाणी शेवटच्या दिवशी कलशदेवाला लाकडी रहाटावर बसवून देव व अन्य मानकऱ्यांना पाच वेळा फिरवलं जात. रहाट म्हणजे आताच्या जत्रांमधून दिसणाऱ्या ''आकाश पाळणा'' (Giant Wheel) याचे ओबडधोबड रूप म्हणायला हरकत नाही. त्या दिवशी मोठी जत्रा भरते. जत्रेत कोकणाची वैशिष्ट्ये असलेले खाजी, शेवयाचे लाडू, साखरेचे चणे-फुटाणे, बत्तासे असे अनेक प्रकार मिळतात. त्याशिवाय रोजच्या जीवनात लागणाऱ्या अनेक वस्तू मिळण्याची दुकाने थाटली जातात.

## १३

उन्हाळ्यात कडाक्याची गर्मी असते. त्यावेळी एवढे दिवस जमिनीत दडून बसलेले साप, विंचू, बुखरी, मालुंड (दुतोंडीसाप), दिवड इ. प्राणी बाहेर पडून इतस्तत: फिरत असतात. चालताना सावधपणे त्यांना टाळून जावे

लागते. कुणाला विंचू किंवा जीवाणू चावल्यास सांभराचे शिंग सहाणेवर झिजवून त्याचा लेप लावतात. चावलेले जीवाणू विषारी की बिनविषारी आहे हे शोधून काढण्यासाठी बाधित व्यक्तीला मीठ खायला देतात. त्याला जर मिठाचा खारटपणा जाणवत नसेल तर चावलेला साप हा विषारी आहे असे समजले जाते. दंश झालेल्या माणसाला ताबडतोब मांत्रिकाकडे नेलं जातं. तो मांत्रिक दंश झालेल्या जागेवर चुन्याच्या निवळीची धार सोडत तोंडाने काहीतरी मंत्र पुटपुटत असतो व कसला तरी झाडपाला आणून दंश झालेल्या माणसाला अंगावरून फिरवतो. तेवढ्या उपचारानेही गुण न आल्यास दंश झालेल्या जागेवर कोंबड्या आणून त्यांचे गुद्‌द्वार त्या जखमेला लावले जाते. विषयुक्त रक्त कोंबड्याच्या पोटात शिरून त्या मरून पडतात. जेव्हा कोंबड्या मरायच्या थांबतात तेव्हा त्या माणसाच्या अंगातील विष उतरले असे समजले जाते. एवढ्या उपचारानेही गुण न आल्यास त्या माणसाला कारवार येथील सरकारी दवाखान्यात नेले जाते. तेथे सर्पदंशावरील लस उपलब्ध असते. बहुतांश वेळा मध्यंतरी पुष्कळ वेळ निघून गेल्यामुळे सर्पदंशाचे रूग्ण मृत्यूमुखी पडतात. जर त्यांना ताबडतोब लस दिली गेली तर मात्र असे रूग्ण नक्कीच वाचतात. आता परिस्थितीत बदल झाला असून सरकारी तसेच खासगी डॉक्टरांच्याकडे लस उपलब्ध करून दिली आहे.

१४

एक दिवस सकाळीच गावात बोंब पडली की किरीस्तांव (ख्रिश्चन) वाड्यावर इगर्जी(चर्च) जवळ राहणाऱ्या मनेल या म्हाताऱ्याने गळफास घेऊन आत्महत्या केली. ती बातमी गावभर पसरताच लोकांचे लोंढे किरिस्तांव वाड्याकडे निघाले. आम्ही मुले पण तिथे धावतपळत गेलो. आजारपणाला कंटाळून मनेलबाबाने रात्री घराच्या पाकाशाला (लग) दोरीचा फास लावून घेऊन आत्महत्या केली होती. तिथे पोचल्यावर तिथले दृश्य बघून आम्ही घाबरून गेलो. मनेलबाबाचे दोन्ही डोळे मोठाले होऊन बाहेर आले होते. तसेच त्यांची लांबलचक जीभ बाहेर लोंबकळत होती. त्याने पायाखाली घेतलेले स्टूल लाथाडून टाकलेले दिसत होते. थोड्या वेळाने गावचे पाटील पोलिसांना घेऊन पंचनामा करण्यासाठी तिथे येऊन पोचले. तासभरात सर्व कायदेशीर सोपस्कर संपवून बैलगाडीतून शव, विच्छेदनासाठी कारवार येथील सिव्हिल हॉस्पीटलमध्ये पाठवण्यात आले. दुसऱ्या दिवशी शव गावी आणण्यात आल्यावर त्याच्यावर चालणाऱ्या धार्मिक

विधीसाठी सर्व धर्मबांधवांनी यावे म्हणून इगरजीची घंटा जोरजोरात वाजवली गेली. एकसारखी दीर्घ वेळपर्यंत इगरजीची घंटा वाजली म्हणजे किरीस्तांव वाड्यावर कोणाचा तरी मृत्यू झाल्याची खूण होती.

पोलिसांनी जमलेल्या सर्व बघ्यांना हकलून लावल्यावर नाईलाजाने आम्हीपण निघालो. वाटेवरील सोयरू प्रभू यांच्या घरासमोर बरीच गर्दी जमलेली दिसली. काय झालं म्हणून चौकशी केल्यावर पुढील शेतात सर्प व सर्पिणीचे थरारक असे प्रेमनृत्य चालले होते. सर्प व सर्पिण एकमेकांना कडकडून आवळून घेऊन आपल्या शेपट्यांवर उभे राहायचे. लांबून बघितल्यास दोन तोंडे असलेला एकच साप आहे असे वाटायचे.त्या प्रेमनृत्याला कोकणीत ''सोरोप जवळतात'' म्हणतात. तशा प्रकारचे चित्तथरारक दृश्य अनेक वर्षांनी मी दूरदर्शनवर पाहिले.

१५

आदिलशाही, सोंदे संस्थानिक, हैदरआली व टिपू सुलतान यांच्या अधिपत्याखाली जेव्हा हा टापू होता तेव्हा कडवाड गाव हे शासनाचे मुख्य केंद्र होते.तसेच ते देशांतर्गत व देशाबाहेरील व्यापारासाठीचे प्रख्यात असे बंदर होते.राज्यशासनाचे मुख्य केंद्र असलेले हे गाव व्यवस्थितपणे आखणी करून रचले होते.मुख्य रस्त्यावर ब्राह्मणवाडा,त्याच्या उजव्या बाजूला बंदराच्या दिशेने सोनारवाडा, सोनारवाड्यानजीक भोईवाडा (मच्छिमार व नावाडी) त्याच्यापुढे नदीकिनारी ख्रिश्चनवाडा,ब्राह्मण वाड्याजवळ महोदवाच्या देवळानजीक देवळीवाडा.या देवळीवाड्यात वाजंत्र्याचे ३-४ मेळ होते. तसेच त्यांच्या बायका ग्रामदेवाची सर्वतऱ्हेची सेवा करीत असत. महोदवाच्या देवळाच्या मागे महालेवाडा (हजामवाडा); त्याच्या बाजूला मुसलमान-वाडा व पुढे महारवाडा गावाच्या सीमेच्या बाहेर एका बाजूला आदिवासी लोक राहत असलेला कुणबीवाडा व दुसऱ्या बाजूला गुनगीवाडा अशा प्रकारे व्यवस्थित मांडणी करून रचलेले कडवाड हे एकमेव असे खेडे आहे. पुढे कडवाड बंदर गाळ व चिखलाने भरून गेल्याने तिथले व्यापार उद्योगाचे व्यवहार थांबले. नंतर आलेल्या इंग्रजांनी कारवार बंदराची स्थापना समुद्रकिनारी केली तेव्हा कडवाडचे महत्त्व कमी झाले.

१६

उन्हाळ्याच्या सुट्टीत दिवसभर आमची मजा होत असली(नाना तऱ्हेचे खेळ व रानमेवा) तरी रात्र मात्र उन्हाळ्याच्या कडाक्याने फारच वाईट परिस्थितीत

जायची. त्या वेळी वीज नसल्यामुळे आजच्यासारखी पंख्यांची व्यवस्था नव्हती. वारा घालून घेण्यासाठी ताडपत्रीचे पंखे वापरले जात. अशा पंख्यांना कोकणीत 'आयणो' असे म्हणतात.

घरात वारा येत नाही म्हणून पुरुषमंडळी घराजवळील अंगणात, देवळाचा सोपा अशा उघड्या ठिकाणी झोपत असत. ब्राह्मण वाड्यावर एकूण सात ठिकाणी मोठमोठाली पिंपळाची झाडे होती. त्यामुळे उघड्यावर जरा गारवा वाटे. आमच्या देवळाच्या पुढे व घराच्या मागील बाजूस अशी दोन भली मोठी पिंपळाची झाडे होती. चटया टाकून आम्ही उघड्यावर झोपत असू तेव्हा गोष्टी सांगून, चावट विनोद करून झोप येईपर्यंत कसातरी टाइमपास करीत असू. अधून मधून फडफडणाऱ्या वटवाघुळांचे चित्कार, घुबडांचे मोठमोठ्याने हुंकारणे इत्यादी चित्रविचित्र आवाजाने थरकाप उडे. त्यावेळी एकमेकांच्या आधाराने आम्ही सकाळ होईपर्यंत वेळ काढीत असू. कधीकधी वाघरुची डरकाळी ऐकायला येई व झोपेचा सत्यानाश होई. मी चौथीची परीक्षा पास झालो व माझा कडवाडचा संबंध सुटला. पुढील शिक्षणासाठी म्हणून मला सुंकेरी या गावात स्थलांतर करावे लागले. अशा प्रकारे माझा 'बाळपणीचा काळ सुखाचा' संपला.

१७

कडवाड गावाच्या पल्याड सुंकेरी नावाचे खेडे आहे. पूर्वी गलबते सामान घेऊन जेव्हा कडवाड बंदराला यायची व सामान घेऊन परतायची तेव्हा शासनाने जकात वसूल करायला म्हणून एक कट्टा बांधलेला होता. त्याला ''जकाती कट्टा'' असे म्हणत. कन्नड भाषेत सुंक म्हणजे 'जकात' व 'केरी' म्हणजे 'गल्ली' दोन्ही शब्द मिळून 'सुंकेरी' हे नाव या गावाला पडले. कडवाड व सुंकेरी या गावाच्या मधोमध काळी नदीचा एक फाटा वाहतो. त्याला 'न्हय' असे म्हणतात. त्या न्हयीतील थोड्या भागात कायम धावते पाणी असते. बाकीच्या भागात भरती व सुक्तीच्या काळाप्रमाणे काही भागातले पाणी वाहून जाऊन तिथे भाट पडलेली असते. अशा वेळी धावते पाणी आहे तिथपर्यंत नावेने येऊन पुढील भाग- जो चिखल व रेतीने भरलेला असतो. अशा भागातून गुडघाभर पाण्यातून कडवाडच्या किनाऱ्यावर यावे लागते.

जेव्हा पूर्ण भरतीची वेळ असेल तेव्हा मात्र कडवाड व सुंकेरी व उलट असा प्रवास,पूर्णतया तरीने पार पाडावा लागे. पावसाळ्यातील चार महिन्यात

दिवशी,देवकार्य,महालय किंवा अन्य धार्मिक कार्य असल्यावेळी भिकरबाप्पा आवर्जून घरी येत.पण ते तेवढ्यापुरतेच असायचे. ते आपल्या पत्नीशी, मुलांशी कधीही प्रेमाने बोललेले एकदाही पाहिलेले नाही.

सुंकेरी एक छोटेसे गाव. कडवाड तर पार करून सुंकेरीत उतरले की नदीकिनारी श्रीरामाचे देऊळ लागे. या देवळाच्या समोरच सावकार कुटुंबाचा भला मोठा असा वाडा होता. राममंदिर हे या सावकार कुटुंबाचेच होते. या वाड्यावरून जरा पुढे आल्यावर श्री. मुकुंद नायक राहत असत. त्यांच्या घराच्या जरा पुढे व्यंकटरमण मठ व त्यांच्या शेजारी श्री गोपाल कृष्ण मंदिर. हा परिसर म्हणजे सुंकेरीतील ब्राह्मणवाडा म्हणायला हरकत नाही. तिथे दहा-बारा भट लोकांची घरे होती. अन्य ब्राह्मण मंडळी म्हणजे नायक, सावकार, ढोपळे, मांजरेकर, फोवकार अशी ब्राह्मणांची घरे. तिथल्या नदी किनारी भोय समाज (मच्छीमार) मोठ्या प्रमाणात राहतो. तिथला लक्ष्मण अंकोलेकर नावाचा भोय समाजाचा मुलगा माझा वर्गमित्र होता. ब्राह्मणवाड्याच्या जरा पुढे जाताच ''जकातीचे कट्टे'' लागे. कारवार बंदर झाल्यापासून तिथे जकात घेण्याचा प्रश्न नव्हता. पण तिथून काळी नदीच्या वरच्या भागाकडे (वैलगाव) व खालच्या भागाकडे (सकलगाव) जाण्या-येण्यासाठी शिडाच्या बोटी मिळत असत. जकातीकट्टा बंदर म्हणून उपयोगात येत होते.

एक दिवस सायंकाळी बाप्पा मला घेऊन सुंकरी येथील श्री. बाबू भट यांच्या घरी घेऊन गेले. आम्ही पोहोचलो तेव्हा सांजवेळ होती. त्यामुळे दिवे लावण्याच्या कामात एक सुंदर, गोरी व तरतरीत अशी मुलगी गुंतलेली होती. ती बाप्पांना ओळखत असल्यामुळे तिने आमचे हसतमुखाने स्वागत केले. तीच बेबी ! थोड्या वेळाने रत्नाकर येऊन दाखल झाला. परस्परांची ओळख झाली व पुढे त्याचे मैत्रीत रूपांतर झाले. रत्नाकरची आई (रमाबाई) हिच्या माहेरचेपण पुरोहित माझे बाबाच करत होते. तिने पुढे येऊन आमचे भरघोस स्वागत केले. लगोलग मावशीपण तिथे आली. रात्री विठ्ठलअण्णा व विष्णूअण्णा यांची भेट झाली. त्यांचे घर म्हणजे एक मोठा वाडाच होता. घराच्या वरचा मजला नानाविध सुबक फर्निचरने सजविलेला होता.त्या माळ्याला रस्त्याच्या बाजूने एक प्रशस्त अशी गच्ची होती. तिथे बसायला रूबाबदार बाक व काही खुर्च्या ठेवल्या होत्या. पुढील सहा वर्षे तो माळा व गॅलरी हेच माझ्या राहण्याचे व अभ्यासाचे ठिकाण

होते मी आणि रत्नाकर तिथेच अभ्यास करायचो काही काळ आमच्यासोबत शेजारील बाबूराय (केशव वैजनाथ ढोपळे) व रत्नाकरचा दामोदर हा बिणगे येथील चुलत भाऊ हे आमच्यासोबत राहून गेले.

२०

बाड येथील शाळेत आम्हाला विविध विषय शिकविण्यासाठी म्हणून अनेक शिक्षक लाभले-मुकुंद मास्तर,हनुमंत मांजरेकर, कृष्ण नायक, विठ्ठल(राया) फौकार, प्रभु मास्तर, मनोरमा कामत, शांता केणी, मारूती पै, वामन कामत,राम मास्तर, यशवंत चित्ताल (नंतरच्या काळात नावारूपास आलेले प्रख्यात कन्नड लेखक) इ. शिक्षकांनी आमची बौद्धिक मशागत केली. काही शिक्षकांचा ठराविक विषयात हातखंड होता. उदा.मुकुंद मास्तर संस्कृत; प्रभू मास्तर कन्नड; शांता केणी इंग्लिश, मारुती पै गणित, वामन कामत भूगोल, यशवंत चित्ताल पदार्थ विज्ञान व रसायन शास्त्र, राम मास्तर गणित व इतिहास इ. शिकवित. राम मास्तर (रामचंद्र नायक) हे कडवाडला माझ्या घराशेजारीच राहत असत. त्यांची कडवाड येथून शिकायला येणाऱ्या विद्यार्थ्यांवर बारीक, करडी नजर असायची.

श्री मारूती पै हे गणिताचे उत्तम शिक्षक होते व त्याचवेळी एक लेखक पण होते डॉ. अ. का. प्रियोळकर यांच्या अध्यक्षतेखाली कारवार येथे भरलेल्या साहित्य संमेलनात श्री. मारूती पै यांच्या जाडजुड अशा आत्मचरित्राचे प्रकाशन झालेले होते. ते आत्मचरित्र मी विकत घेऊन वाचलेले माझ्या स्मरणात आहे प्रभु मास्तर यांचा कन्नड शिकविण्यात हातखंड होता. व्याकरण व छंदशास्त्र ते उत्तम रीतीने शिकवत असत त्यांच्या प्रोत्साहनाने रत्नाकरने कन्नड भाषेत बोर्डात पहिला नंबर काढला होता. प्रभु मास्तर येण्याअगोदर कर्नाटकातून श्री. हेब्बार आडनावाचे एक शिक्षक कन्नड शिकवायला आले होते. ते एकसारखे सिगारेट फुंकीत असत त्याचा वाईट परिणाम विद्यार्थ्यांवर होईल म्हणून काही पालकांनी चिंता व्यक्त केली होती. त्यातच कोडिबाग येथून शाळेत येणाऱ्या नाडकर्णी नावाच्या सुंदर मुलीशी त्यांची लगट वाढायला लागली. त्यामुळे संचालक मंडळाने त्यांना राजीनामा द्यायला लावला.

शांता केणी ह्या शिक्षिका उत्तमरितीने आम्हाला इंग्रजी शिकवित. तसेच श्री कृष्ण सावकार इतिहास उत्तमरितीने शिकवीत. आमच्या वर्गात एकूण १९ मुले - मुले ३ मुली व १६ मुले. शाळेने नुकतेच हॉली बॉल, फुटबॉल व कबड्डी

खेळ सुरू केले होते.मी फुटबॉल संघात प्रवेश घेतला. पुढे मी शाळेतील क्रिकेट टीममध्येपण काही काळ खेळलेलो आहे. मुलांचा कबड्डी संघ आजूबाजूच्या शाळांतून विजय मिळवून यायला लागला. तेव्हा आमच्या शाळेतील मुलींच्या अंगात वीररसाचा संचार झाला. मुख्याध्यापक श्री.कृष्णा नाईक यांना सांगून त्यांनी आपला संघ तयार केला. या कामात तारा शेणवीने पुढाकार घेऊन संघ बांधण्यात बरीच मेहनत घेतली.ती रंगाने काळी सावळी होती तरी अंगाने धडधाकट होती.केसांचा बॉबकट करून त्यावेळच्या समाजाला तिने धक्का दिला होता.तिला तिचे वडील स्वातंत्र्यसैनिक श्री. रघुपति शेणवी जे पुरोगामी विचारांचे होते. त्यांचा भरभक्कम पाठिंबा होता. त्यामुळे ती कुणाच्या टीकेला भीक घालीत नव्हती. साहजिकच तारा कबड्डी संघाची कॅप्टन झाली होती तेव्हापासून ''कॅप्टन तारा'' असे ती ओळखली जाऊ लागली. ती स्वभावाने बेधडक व अरेला कारे म्हणणारी असल्यामुळे मुले तिची टिंगल टवाळी करण्यास घाबरत असत. त्या मानाने स्वभावाने शामळू असलेल्या गोदावरी व इंदू या मात्र मुलांच्या टिंगलीला बळी पडत. मग तारा त्यांची बाजू घेऊन संबंधित मुलाला झापे.

कॅप्टन ताराच्या नेतृत्वाखाली आमच्या शाळेतील मुलींच्या कबड्डी संधाने विजयांची मालिकाच सुरू केली. आमच्या शाळेच्या शेजारीच कोकण मराठा समाजाच्या अधिपत्याखाली ''श्री शिवाजी मराठा हायस्कूल'' चालत असे. आमच्या शाळेतील संचालक मंडळावर ब्राह्मणांचे वर्चस्व होते. त्यामुळे दोन्ही शाळांच्यामध्ये छुपी स्पर्धा होती. त्यामुळे या दोन्ही शाळांच्यामधील खेळांच्या स्पर्धेच्या वेळी जबरदस्त हमरी-तुमरी चाले व कधी-कधी दोन्ही गटांच्या विद्यार्थ्यांत मारहाणीपण होत असे. आमची शाळा कारवार येथील हिंदू हायस्कूल व अन्य शाळांविरूद्ध खेळातील स्पर्धांत भाग घेई.

सर्व शिक्षकांच्यामध्ये एकोपा होता. परस्परांत मत्सर किवा चढाओढ नव्हती. शाळेचे नाव पुढे आले पाहिजे व शाळा भरभराटीला आली पाहिजे असे त्यांचे ध्येय होते. त्यामुळे अगदी तुटपुंज्या अशा पगारावर जीव ओतून सर्वजण शिकवित असत. आजच्या बहुतांश शिक्षकासारखे 'टोपल्या टाकण्यांचे काम ' ते करीत नसत.

२१

शाळेत जाणाऱ्या मुलांत प्रचलित असलेला चिडवाचिडवीचा खेळ

आमच्या शाळेतपण चाले. एक-मेकांना कोणत्या तरी कारणावरून नावे ठेवली जायची. सुरुवातीला ज्यांना अशी नावे ठेवली जात ते फार चिडायचे पण पुढे त्याची सवय झाल्यामुळे त्यांना काही वाटेनासे होई. त्यावेळची काही टोपण नावे मला आजही आठवतात.

उदा. रामकृष्ण अनंत पै (R.A.PAI) याला ''रूपयाआणा पै'' असे चिंडवीत; रमाकांत उत्तम कोल्हटकर (R.U.KOLHATKAR) याला प्रश्न विचारल्यासारखे "Are you Kolhatkar ?" असे विचारायचे. कमला केशव कामत (K.K.K.) हिला $K^3$(K cube) असे चिडवित. वसंत बांदेकर नावाचा मुलगा जरा धांद्रट होता म्हणून त्याला 'मेंटल वसंत' असे म्हणत. इंग्रजी आद्याक्षराप्रमाणे माझे नाव ''व्हि. डी. भट'' मुले मला ''विडी भट, सिगारेट आहे का?'' असे चिडवायचे. अशा अनेक गमती -जमती चालत असत.

मी आठवीत शिकत असताना वर्षातून एकदा निसर्ग सहल काढाव्यात व ज्ञानवर्धक असे कार्यक्रम घ्यावेत,असा सरकारी फतवा निघाला. अशा सहलींना नाममात्र असे शुल्क असे प्रत्येक विद्यार्थ्याने आपली शिदोरी बरोबर आणायची अशी प्रथा होती. अशा निसर्गसहलींच्यामुळे मला गुड्डेहळ्ळी (डोंगरावरील खेडे),श्री गोकर्ण क्षेत्र, देवगड, तीळमाती अशा ठिकाणी जाण्याचा योग आला.

गुड्डेहळळी म्हणजे उंच डोंगर चढून वर गेल्यावर एका पठारावर जुन्या किल्ल्याचे अवशेष व घरांचे पाया दिसतात. त्यामुळे तिथे पूर्वी वस्ती होती असे दिसते. तिथे पाण्याची व्यवस्था असल्यामुळे जेवण-खाण बनविणे किंवा चहा तयार करणे शक्य होई. पण त्यासाठी लागणारी भांडीकुंडी व वाणसामान बरोबर घेऊन जावे लागे.

''दक्षिणेकडील काशी''म्हणून प्रख्यात असलेले क्षेत्र म्हणजे ''श्री गोकर्णक्षेत्र'' तिथे महाबळेश्वराचे प्रसिद्ध असे मंदिर आहे ते मंदिर समुद्रकिनाऱ्यावर आहे.निसर्गरम्य अशा ठिकाणी वसलेले हे तीर्थक्षेत्र अनेक तलाव व धबधबे यानी रमणीय दिसते.''पक्षितीर्थ'',''कोटीतीर्थ'',''गरूडतीर्थ'',''रामतीर्थ''अशा अनेक नावाचे तलाव व धबधबे तिथे आढळतात शिवरात्रीच्या दिवशी ओढला जाणारा तिथला रथ हा अतिशय उंच व डौलदार असा आहे. त्या रथोत्सवात सहभागी होण्यासाठी लाखो भाविक तेथे दरसाल जमतात.या परिसराचा आकार गाईच्या कानासारखा दिसतो म्हणून या स्थळाचे नाव ''गोकर्ण''असे पडले.

## जांबावली ते आंबीवली

महाबळेश्वराचे हे स्थान कसे निर्माण झाले याबाबत मनोरंजक अशी कहाणी आहे. एकदा लंकाधिपती रावणाने कैलास पर्वतावर बसून घोर तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न करून घेतले शंकराने ''तुला काय हवे?'' असे विचारल्यावर रावणाने महादेवाचे आत्मलिंग मागितले. ही गोष्ट अन्य देवांना समजताच त्यांनी भगवान शंकराला तसे करण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला.

दिलेला वर मागे घेणे महेशाला अप्रस्तुत वाटत होते. म्हणून सर्वांनी मिळून विचार करून त्यावर एक तोडगा काढला. त्यानुसार शंकराने रावणाला सांगितले. ''ठरल्याप्रमाणे मी तुला आत्मलिंग देत आहे पण इथून तू तुझ्या घरी (लंकेला) पोहचेपर्यंत हे लिंग कोठेही मध्यंतरी ठेवायचे नाही तसे ठेवल्यास ते लिंग जिथे ठेवले तिथेच प्रस्थापित होईल.'' शंकराचे ते सांगणे मान्य करून रावण दक्षिणेकडे (लंकेकडे) त्वरेने निघाला. देवांनी ठरवलेल्या योजनेप्रमाणे त्याला ठराविक ठिकाणी पोहचल्यावर मूत्रविसर्जनाची जोरदार इच्छा झाली. मूत्रविसर्जनाच्या वेळी लिंग हातात ठेवणे रावणाला अधार्मिक वाटले.

विवंचनेत सापडलेला रावण आजूबाजूला कोणीतरी दिसतो का म्हणून बघायला लागला, तेव्हा त्याला एक बालगुराखी दिसला. तो गुराखी म्हणजे रूपपरिवर्तन केलेला गणेश होता. रावणाने त्या गुराख्याला जवळ बोलावून आपण लघवी करून येईपर्यंत ते लिंग हातात धरून ठेवण्याची विनंती केली व ते लिंग कोणत्याही परिस्थितीत जमिनीवर न ठेवण्याबाबत बजाविले. गणेशाने तसे कबूल करून लिंग आपल्या हातात घेतले. आपण तीन वेळा हाक मारणार व त्या वेळेत रावण न परतल्यास आपण लिंग खाली ठेवणार असे त्याने सांगितले. ते कबूल करून रावण जवळच्या झाडीत लघवीसाठी म्हणून गेला. तेवढ्यात गुराख्याच्या रूपातील गणपतीने तीन वेळा रावणाला हाक मारून लिंग जमिनीवर ठेवून पळ काढला. काही वेळाने धावत येऊन रावणाने गुराख्याला पकडले व त्याच्या डोक्यात एक जोरदार बुक्का मारला. गणपतीच्या डोक्याला मोठी खोक पडली व तो बेशुद्ध झाला.

क्रोधभरीत रावणाने मग ते जमिनीत स्थिरावलेले लिंग उपटून काढण्याचा प्रयत्न केला. कितीही ताकद लावली तरी ते लिग बाहेर न येता त्याचा एक–एक तुकडा रावणाच्या हाती यायला लागला. असे आठ तुकडे रावणाने भिरकावून दिले. जिकडे लिंगाचे तुकडे जाऊन पडले तेथे नंतर शिवालये स्थापन करण्यात

आली-शेजेश्वर, धारेश्वर, मुरडेश्वर अशा नावाची क्षेत्रे तयार झाली मूळ लिंग मात्र अजूनही गोकर्णातच आहे. ते लिंग म्हणजे तुकडे उडालेल्या स्वरूपातील लिंगाचा भाग. त्यालाच महाबळेश्वर असे म्हणतात. निराश होऊन रावण निघून गेल्यावर गणपती कैलास पर्वतावर गेला. गणपती जिथे बेशुद्ध होऊन पडला होता तेथे लहानसे देऊळ आहे. त्या देवळात डोक्याला खोक पडलेल्या गणेशाची लहानशी उभी मूर्ती आहे. त्या मूर्तीला ''बुक्क गणपती'' असे म्हणतात. महाबळेश्वराच्या मंदिराच्या मागे रावणाने जिथे लघवी केली तिथे लहानसे हिरव्या रंगाचे पाणी असलेले कुंड आहे. त्याला 'रावणकुंड' असे म्हणतात. आता कोकण रेल्वेचे स्थानक गोकर्ण येथे आहे.

कारवार बंदरापासून काही अंतरावर देवगड नावाचे एक विशाल द्वीप(बेट) आहे.तिथे इंग्रजांनी आजूबाजूच्या समुद्रातील गलबतांना इशारा देण्यासाठी म्हणून उंच असा दीपस्तंभ उभारलेला आहे. वरती गोलाकार फिरणारा असा मोठा काचेचा दिवा आहे तो दिवा दररोज सायंकाळपासून सकाळपर्यंत पेटत असतो. त्या दिव्याची देखभाल करण्यासाठी म्हणून सरकारी नोकरांची दोन बिऱ्हाडे तेथे ठेवण्यात आली आहेत. तिथले लोक दररोज बोटीने किनाऱ्यावर येऊन आपल्याला हवे असलेले सामान-सुमान घेऊन जातात. दीपस्तंभात वरपर्यंत पोचायला म्हणून अनेक पायऱ्या आहेत. अनेक वर्षांनी दिल्ली येथील कुतुबमिनारमधील शिड्या चढताना लहानपणी केलेल्या देवगडावरील दीपस्तंभाच्या सहलीची आठवण झाली आता तिथला दिवा विजेवर चालतो. काडवाडच्या एका टोकाला कोडीबाग धक्का आहे. तिथे काळी नदी व अरबी समुद्र यांचा संगम झालेला आहे तिथून काळी नदीच्या दोन्ही तिरांवर वसलेल्या साधारण वीस मैलांपर्यंत विखुरलेल्या गावात कोडीबागातून शिडाच्या बोटीतून सामान व माणसांची वाहतूक होत असे. तसेच त्या धक्क्यापर्यंत गोव्याला जाणाऱ्यांची व येणाऱ्यांची वाहतूक चाले. काही वर्षांपूर्वी बोटींच्याऐवजी लॉच सुरू झाल्या आता कोडीबाग व सदाशिवगडांना जोडणारा भव्य असा पूल तयार झाला आहे ह्या पुलावरून राष्ट्रीय महामार्ग क्र १७ गोवा व महाराष्ट्रातून पुढे जातो.

सदाशिवगडाजवळ माजाळी नावाचे खेडे आहे माजाळीच्या समुद्र किनाऱ्यावर अनेक जण सहलीसाठी येतात तिथल्या वाळूचे खास असे वैशिष्ट्य आहे समुद्राच्या लाटांच्या घर्षणाने काळे दगड व पांढरे दगड यांची वाळू एकत्र

होऊन संपूर्ण समुद्रकिनारा म्हणजे काळ्या व पांढऱ्या तिळांनी भरलेल्या किनारा वाटतो. त्यामुळे लोकांनी या किनाऱ्याला ''तिळमाती'' असे नामकरण केले आहे. परतताना पर्यटक आठवण म्हणून ''तिळमाती '' भरभरून घेऊन जातात. मराठीतील प्रख्यात नटी जयश्री गडकर यांचे घर या पर्यटन स्थलाजवळ आहे.

२२

इंग्रजी शाळेत असताना एकदा I.N.S. Mysore ही युद्धनौका कारवारला काही दिवसांसाठी आलेली होती. त्यावेळी लोकांच्या मागणीनुसार जनतेला पाहण्यासाठी म्हणून ती नौका खुली करण्यात आली. मोठ्या माणसांना आठ आणे व मुलांना चार आणे अशी प्रवेश फी होती. आमच्या शाळेने विद्यार्थ्यांसाठी म्हणून बोटीवर सहल आयोजित केली. ती युद्धनौका अजस्त्र असल्यामुळे कारवार बंदारपर्यंत पोहचू शकत नव्हती. म्हणून भर समुद्रात किनाऱ्याहून दूर अशा ठिकाणी युद्धनौकेने नांगर टाकला होता. बंदराहून बोटीपर्यंत जाऊन येण्यासाठी लॉंचेसची व्यवस्था केली होती. आमच्या लॉंचवरून युद्धनौकेवर पोहचण्यासाठी म्हणून वरून लांबलचक अशी सरकती शिडी पाण्यात सोडण्यात आली. त्यावरून चढून बोटीपर्यंत जाताना मोठमोठ्या लाटांच्यामुळे शिडी हिंदकळत होती. त्यामुळे घाबरून अनेक विद्यार्थी रडत होते. पण त्या विस्तृत शिडीच्या दोन्ही बाजूला नौसेनेचे जवान आमच्या संरक्षणासाठी उभे होते. बोटीवरील सर्व परिसर हिंडून बघायला तीन तासांचा अवधी लागला. बोटीच्या अगदी वरच्या डेकवर विमाने पार्क केलेली होती. ठिकठिकाणी लावून ठेवलेल्या अजस्त्र दुर्बिण्या व अन्य मशीनरी बघून आम्हांला वेड लागायची पाळी आली. शेवटी बोटीवरील कप्तानने निरोपाचे छोटेसे भाषण करून आम्हाला शुभेच्छा दिल्या. प्रत्येकाला एक कप चहा व पिवळी धम्मक अशी दोन बिस्किटे देण्यात आली. बिस्किट चहात बुडवताच लोण्यासारखे मऊ झाले. अशा प्रकारचे बिस्किट खाण्याची ती माझी पहिलीच वेळ होती.

२३

आमची तिमाही परीक्षा चालू होती. अकस्मात हेडमास्तर वर्गात आले व त्यांनी परीक्षा थांबवण्याचा आदेश दिला. डोक्यावरील टोपी काढून त्यांनी एका दुःखद बातमीची घोषणा केली. आम्हाला ड्रॉइंग व अन्य विषय शिकवणारे राम मास्तर यांचे कडवाड येथील त्यांच्या घरी दुःखद निधन झाले होते. काही

दिवसांपासून ते तापाने आजारी होते असे ऐकण्यात आले होते. त्यांच्या अंत्यदर्शनासाठी जाता यावे म्हणून शाळेला सुट्टी जाहीर करण्यात आली. राम मास्तर हे विद्यार्थीप्रिय शिक्षक असल्यामुळे सर्वजण झुंडीने कडवाडला जायला निघाले. नदीतून पल्याड जाण्यासाठी उभ्या असलेल्या बोटीत क्षमतेपेक्षा जास्त जण चढल्यामुळे होडी (बोट) काही अंतरावर पोचताच बुडाली व आम्ही सर्वजण पाण्यात पडलो. सुदैवाने तिथे पाणी जास्त खोल नसल्यामुळे सर्वजण वाचलो मग ओल्या कपड्यानिशीच आम्ही राममास्तर यांच्या घरी पोचलो तेव्हा अंगणात त्यांचा देह अंत्यदर्शनासाठी आणून ठेवला होता. आमच्या काही शिक्षकांनी राममास्तरांचे गुणगान करणारी भाषणे केल्यावर मृतदेह अंत्यसंस्कारासाठी नेण्यासाठी म्हणून उचलण्यात आला. तेव्हा राममास्तर यांचा लहान मुलगा शेषगिरी(शेषी) हमसून -हमसून रडत होता. ते दृश्य अजूनही माझ्या डोळ्यासमोर हुबेहुब उभे आहे.

पावसाळ्याचे दिवस होते. अविरत पाऊस पडून कडवाड नदीला मोठा पूर आला होता. सगळा परिसर लाल पाण्यानें भरुन गेलेला होता. आजूबाजूच्या डोंगरातून लाल पाण्याचे लोंढे वाहत असल्यामुळे संपूर्ण नदीजवळील परिसरात जणू काही लाल रंगाचा चहाच ओतून टाकलेला होता. देहभान विसरून गावातील लहान-थोर ते विरळ व विराट असे दृश्य पाहून अचंबित झाले होते. तेवढ्यात काही तरुण मुलांनी त्या लाल पाण्यात पोहण्यासाठी म्हणून उड्या घेतल्या. तीरावरील लोकांनी त्यांना मागे फिरा म्हणून आग्रह सुरू केला तेव्हा आत्माराम सोडून बाकी सर्वजण परतले आत्माराम आमच्या शाळेत माझ्यापेक्षा एक वर्षाने पुढे होता. तो न परतल्यामुळे हल्लकोळ माजला. बातमी गावभर पसरली तेव्हा आत्मारामचे वडील (शिवा कडवाडकर) व त्यांच्या घरातील अन्य मंडळी रडत -भेकत किनाऱ्यावर आली. मोठे मोठे दोर घेऊन काही धाडसी भोय मंडळी आपापल्या होड्या काढून भर पुराच्या पाण्यात निघाले. रात्र सुरू झाली तरी आत्मारामचा पत्ता न लागल्यामुळे सर्व होड्या परतल्या.

दुसऱ्या दिवशी सकाळी मी झोपेत असतानाच आत्मारामचे शव किनाऱ्याला येऊन एका झाडाला अडकून पडल्याची बातमी न्हेनीने मला सांगितली. आत्माराम माझा आवडता मित्र होता. त्यामुळे तोंड न धुताच मी नदी किनारी धाव मारली. माझ्या संगत अन्य अनेक जण धावत होते. आम्ही तिथे पोचेपर्यत

आत्मारामचे शव उचलून आणून रस्त्यावर ठेवण्यात आले होते. तीस-पस्तीस तास शव पाण्यात असल्यामुळे ते फुगून टम्म झाले होते. त्याचा चेहरा तर ओळखायलाच येत नव्हता. त्याचा नाकाचा शेंडा, कानाच्या पाळ्या व गाल माशांनी कुरतडून खाऊन विद्रूप करून टाकले होते. ते दृश्य बघताच मी चक्कर येऊन खाली पडलो. लोकांनी उचलून मला घरापर्यंत कधी आणले व कोणी आणले याचे मला काही भान नव्हते. बऱ्याच वेळाने मी शुद्धीवर आलो व घरातील लोकांचा जीव भांड्यात पडला. पुढे अनेक दिवस त्या भयंकर दृश्याची आठवण होऊन माझा थरकाप उडत असे.

२४

आमच्या शाळेतर्फे एस्. एस्. एल. सी. ला पहिली बॅच १९५१ साली बोर्डाच्या परिक्षेला बसली. एकूण चौदा विद्यार्थी परिक्षेला बसले होते. त्यातील ११ जण पास झाले. त्याच्या पुढच्याच वर्षी म्हणजेच १९५२ साली आमची बॅच परिक्षेला बसणार होती.

मी इंग्रजी शाळेत शिकत असतानाच राममास्तर यांच्या प्रोत्साहनाने एलिमेंट्री व इंटर मिजिएट ह्या ड्रॉइंगच्या परीक्षा पास केल्या. राममास्तर यांच्या दु:खद निधनामुळे ड्रॉईंगच्या पुढच्या परिक्षा द्यायला मला शक्य झाले नाही. ड्रॉइंगचे शिक्षण थांबले तेव्हा हिंदीची शिकवणी सुरू झाली. महात्मा गांधीच्या प्रेरणेने मद्रास येथे सुरू झालेल्या 'दक्षिण भारत हिंदी प्रचार सभा' या संस्थेतर्फे ऐच्छिक स्वरूपात हिंदी अभ्यासक्रम शिकवून त्याच्या परिक्षा घेतल्या जात व प्रमाणपत्रे दिली जात. आमच्या शाळेतर्फे चार जणांनी हिंदी शिकण्याची तयारी दाखविली. कारवारहून श्री. नायक नावाचे शिक्षक आमच्या शाळेत येऊन सोमवार, बुधवार व शुक्रवार सायंकाळी शाळा सुटल्यावर वर्ग घेत. पूर्वीपासूनच भाषा हा माझा Strong Point असल्यामुळे मी भराभर हिंदी भाषेत प्राविण्य मिळविले. प्रथमा, मध्यमा व राष्ट्रभाषा अशा तीन परीक्षा मी लीलया पास केल्या. प्रवेशिका ह्या त्यापुढील परिक्षेच्या वेळी मी लेखी परिक्षा दिल्या. पण काही दिवसांनी होऊ घातलेल्या मौखिक परिक्षेच्या वेळी गोवरने (देवसे) गंभीर स्वरूपात आजारी पडलो. त्यामुळे प्रवेशिका परीक्षा मी पास करू शकलो नाही. त्यादृष्टीने माझे नुकसान झाले तरी प्रवेशिका परीक्षेच्या निमित्ताने हिंदीतील दिग्गज साहित्यिक प्रेमचंद, मैथीलीशरण गुप्त, सुमित्रानंदन पंत इत्यादींच्या सुंदर साहित्य कलाकृतींशी

संबंध माझा आला. आजही मी मराठी, इंग्रजी, कन्नड, कोकणी, संस्कृत या भाषांतील साहित्याबरोबर हिंदीतील साहित्य पण आवडीने वाचत असतो हिंदी साहित्याला आजपर्यंत आठ वेळा ज्ञानपीठ पुरस्कार लाभलेला आहे. त्या पाठोपाठ कन्नड भाषेतील साहित्याला सहा वेळा हा पुरस्कार लाभलेला आहे. मराठीत मात्र सर्वश्री वि. स. खांडेकर, कवी कुसुमाग्रज व विं दा. करंदीकर यांना ज्ञानपीठ पुरस्कार लाभलेला आहे..

२५

१९५२ साली मी एस्. एस् एल्. सी. ची परीक्षा पास झालो. १९ जणांपैकी १७ जण पास झाले. मी डिस्टिंक्शन घेऊन पास झालो. श्री सदानंद शेणवी हे संपूर्ण जिल्ह्यात पहिले आले तर रत्नाकर भट कन्नड भाषेत राज्यातून पहिले आले होते. अन्य विषयांत व भाषांत मला चांगले गुण मिळाले होते तरी माझे जन्मापासूनचे हाडवैरी असलेले अंकगणित, बीजगणित व भूमिती हे ग्रह आडवे आले होते. मी कसाबसा गणित विषयात काठावर पास झालो होतो. मला तर मी गणितात पास होईन असे वाटतच नव्हते. पण बोर्डाला दया आली असावी किंवा माझे नशिब थोर असावे. गणित विषयात कमी गुण मिळाल्यामुळे मी सरासरी गुणांमध्ये खाली घसरलो. आजही गणित विषय म्हटला की माझ्या कपाळाला आठ्या पडतात. माझ्या मुलींना व आता नातींना मी गणित विषय सोडून अन्य विषय शिकवितो. आताचे गणित पण आमच्या वेळच्या गणितापेक्षा फारच वेगळे आहे त्यामुळे पण वांधे होतात.

रत्नाकर कन्नड भाषेत राज्यातून पहिला आल्यामुळे त्याचं सर्वत्र कौतुक झाले मी त्याचा फोटो काढून घेऊन कुमठ्याहून प्रकाशित होणाऱ्या कन्नड साप्ताहिक ''कानडावृत्त'' यात सविस्तर माहितीसह पाठवून दिला. तो एका चौकटीत प्रकाशित करण्यात आला. सदानंद शेणवी जिल्ह्यातून पहिला आल्याबद्दल त्याचे सगळीकडे अभिनंदन व कौतुक करण्यात आले त्याचे वडील लहानपणीच वारले होते. परंतु त्याच्या आईने धाडसाने, गरिबीत जीवन कंठून अभ्यासात हुशार असलेल्या सदानंदाला शिक्षणाची संधी मिळवून दिली. सदानंदाने त्या सधीचे सोने केले. पुढे सदानंद पदवीधर होऊन व अन्य प्रशिक्षण घेऊन तो केंद्र सरकारच्या विभागात उच्चपदापर्यंत पोचला. निवृत्तीनंतर सदानंद हुबळीला स्थायिक झालेला आहे तर रत्नाकर बेंगळूर येथे.

२६

सुरूवातीला आमची बाड येथील शाळा दोन सत्रांत भरायची. सकाळी सात ते साडेदहा व सायंकाळी दोन ते साडेपाच, बाड, नंदनगद्दा येथे राहणाऱ्या विद्यार्थ्यांना त्याबद्दल काही वाटत नसे. पण सुंकेरी, कठीणकोण व कडवाडहून येणाऱ्या विद्यार्थ्यांना दोन सत्रांत दर दिवस ये जा करणे त्रासदायक वाटे. उन्हाळ्यात पायाखालची रेती भगभगून उठत होती तर पावसाळ्यात सर्वत्र चिखल व राडा झालेला असायचा. त्यावेळी चप्पल वापरण्याची पद्धत नव्हती. सर्व विद्यार्थी अनवाणीच चालत असत.

एक दिवस शाळा सुटल्यावर कडवाड व सुंकेरी येथून येणारे विद्यार्थी एकत्र जमून हेडमास्तर कृष्णा नायक यांच्या केबिनमध्ये शिरले व त्यांनी आपले गाऱ्हाणे मांडले. प्रारंभी ते काहीही ऐकून घेण्याच्या मन:स्थितीत नव्हते. विद्यार्थ्यांनी ''दुसऱ्या दिवसापासून नाइलाजाने आपणाला संप करावा लागेल.'' असे सांगितल्यावर ते थोडे नरमले. ''तुमची तक्रार व्यवस्थापन कमिटीपुढे ठेवतो.'' असे सांगून त्यांनी आपली तात्पुरती सुटका करून घेतली. रत्नाकरचे वडील बाबाप्पा व नंदनगद्दे येथील एक व्यापारी विठ्ठल शेणवी-नेवरेकर हे दोघेजण व्यवस्थापन कमिटीवर सभासद होते. त्या दोघांना भेटून आमची बाजू पटविण्यास आम्ही यशस्वी ठरलो. कमिटीने मग शाळा दिवसातून फक्त एकदाच साडेदहा ते साडेपाच या दरम्यान भरवावी असा ठराव एकमताने पास केला. अशाप्रकारे आम्ही एका मोठ्या कटकटीतून पार पडलो.

२७

सुरूवातीला मुकुंद मास्तर व त्यांचे अन्य काही सहकारी मिळून सुरू केलेल्या या शाळेला मूर्त स्वरूप द्यावे व संस्था व्यावसायिक पद्धतीने चालवावी असे व्यवस्थापन कमिटीने ठरविले. सरकारी अनुदान मिळवावे, खाजगी संस्था व धनिक वर्गाकडून मदत मिळवावी असे ठरले. त्यासाठी शिक्षण खात्याचे सर्व कायदे कानून समजणारा आधुनिक विचारांच्या माणसाची गरज होती. त्याचवेळी मुंबई येथे नागरी पुरवठा खात्यात उच्च पदावर काम करीत असलेले श्री. कृष्णा नायक हे गावी रजेवर आले होते. त्यावेळी आमच्या संस्थेचे अध्यक्ष असलेले कारवार येथील प्रख्यात वकील श्री. कृष्णराव हळदीपूरकर यांनी कृष्णा नायक यांना शाळेचे मुख्याध्यापकपद स्वीकारावे असे सुचविले.

कृष्णा नायक यांनी स्वातंत्र्य चळवळीत भाग घेऊन सश्रम कारावासाची सजा भोगली होती. कारावासात असताना त्यांना दगड फोडण्याचे काम देण्यात आले होते. त्यावेळी उडालेल्या एका कपचीने त्यांचा डावा डोळा कायमचाच निकामी झाला. पुढे त्या डोळ्याचे ऑपरेशन होऊन त्या जागी काचेचा डोळा बसविण्यात आला.खरं म्हणजे त्या काचेच्या डोळ्याने त्यांना काहीही दिसत नव्हते. पण इतरांना मात्र तो डोळा व्यवस्थित आहे असे वाटे. डोळ्यातील पाणी वारंवार काचेच्या डोळ्यात भरले की ते तो डोळा बाहेर काढून, पाणी झटकून परत व्यवस्थित डोळ्यात बसवायचे. आम्हाला वर्गात शिकवताना सुद्धा त्यांचे अनेकवेळा हे काम चाले. त्यांच्या काचेच्या डोळ्याला आम्ही सर्वजण ''बकरीचा डोळा''असे म्हणत होतो. काही टारगट मुलांनी त्यांना 'एकाक्ष' असे नाव ठेवले होते.

कृष्णा नायक बरीच वर्षे मुंबईत राहिल्यामुळे ते कायम खादीचे का असेना पण सुटाबुटात राहत असत. भडक रंगाचा टाय लावून व डोक्यावर हॅट घालून ते 'बिणगा' या त्यांच्या गावाहून शाळेपर्यंत सायकलवरून ये-जा करीत. मुकुंद मास्तर यांना आपले मुख्याध्यापकपद गमावल्याचे शल्य होते म्हणून ते आडून-आडून कृष्णा नायक त्यांच्या कार्यपद्धतीतील चुका व दोष कमिटी सभासदांना, अन्य शिक्षकांना व कधी कधी विद्यार्थ्यांना पण सांगत असत शिक्षण संस्था चालवायला लागणारी करडी शिस्त, नोकरशहांच्या कडून काम करून घेण्याची लकब व रुबाबदार व्यक्तिमत्त्वामुळे कृष्णा नायक त्यांचा सर्वत्र दबदबा असायचा.

२८

भारत स्वतंत्र झाल्यानंतरच्या पहिल्याच लोकसभेच्या निवडणुकीला प्रख्यात पत्रकार श्री. जोकिम आलवा (आजच्या कॉंग्रेसच्या प्रभारी श्रीमती मार्गारेट आलवा यांचे सासरे) आमच्या विभागातून उभे होते त्यावेळी ते कृष्णा नायक यांना घेऊन गावोगावी सभा घेत असत. जोकिम आलवा सहजपणे भरघोस मतांनी निवडून आले आम्ही विद्यार्थ्यांनीपण त्यांच्या निवडणूक मोहिमेत भाग घेतला होता. जोकिम आलवा संपादन करत असलेल्या इंग्रजी साप्ताहिक "Forum" यात त्यांनी कृष्णा नायक यांचे फोटोसहित अभिनंदन करताना ' समर्पक असे शीर्षक दिले होते,

"One eye, but double faith"

पुढे विधानसभेच्या निवडणुका जाहीर झाल्या. तेव्हा साहजिकच सर्वांना कृष्णा नायक यांना काँग्रेसची उमेद्वारी मिळेल असे वाटत होते. पण उमेदद्वारी भलत्याच कुणालातरी देण्यात आली. त्यामुळे नाराज होऊन कृष्णा नायक यांनी अपक्ष म्हणून उमेदवारी अर्ज भरला. 'कोंबडा' ही त्यांना निशाणी मिळाली होती. त्यांचा मुलगा व्हि.के.नायक याच्या नेतृत्वाखाली २५ जणांची एक सायकल तुकडी खेडोपाडी जाऊन हातात जिवंत कोंबडे धरून प्रचार करत होती. गावातील जुने लोक टिंगल करायचे,''बामणालि पोरां कोंब्याली पिलां घेवन नाचतात.''त्या निवडणुकीत कृष्णा नायक यांचा पराभव झाला हे सांगायला नको. दरम्यान लोकसभा सदस्य असलेले जोकिम आलवा यांचे निधन झाले. पुढील लोकसभा निवडणुकीच्या वेळेला त्यांची पत्नी व्हायोलेट आल्वा यांना तिकीट मिळाले. नाराज असलेल्या कृष्णा नायक त्यावेळी निवडणूक प्रचाराला उतरले नाहीत. धास्तावलेल्या व्हायोलेट आल्वा यांनी कृष्णा नायक यांच्या घरी जाऊन त्यांची समजूत काढली दिवसभर ''बाबा-पुता'' करून कृष्णा नायक यांचे मन वळविले.

अपेक्षेप्रमाणे व्हायोलेट आल्वा निवडून आल्या व केंद्रसरकारात उपमंत्री झाल्या. त्यांचा भव्य असा सत्कार आमच्या शाळेतील पटांगणात करण्याचा घाट कृष्णा मास्तर यांनी मांडला. त्यावेळी मी एस्.एस्.एल्.सी. परीक्षा पास करुन गावी बेकारीत दिवस काढीत होतो. जोकिम आल्वा, कृष्णा मास्तर व व्हायोलेट आल्वा यांच्या निवडणूक प्रचारात मी सक्रिय काम केले होते. त्यामुळे माझ्या डोक्यात नेतागिरी करण्याचे वारे शिरले.कडवाड,सुंकेरी दरम्यान असलेल्या नदीवर पूल बांधून घ्यावा असं माझ्या डोक्यात शिरलं. केंद्रीय राज्यमंत्री व्हायोलेट आल्वा आमच्या शाळेला भेट देणार असल्याची संधी साधून मी पुलाच्या मागणीचे एक विस्तृत निवेदन तयार केले.त्यावर गावतील हजारभर लोकांच्या सह्या घेतल्या. व्हायोलेट आल्वा यांच्या सत्काराच्या एक दिवस आगोदर मी कृ ष्णा नायक (हेडमास्तर) यांना भेटून मला मंत्र्यांना एक निवेदन सादर करण्याची परवानगी द्याची अशी विनंती केली. 'कार्यक्रम शाळेतर्फे असल्यामुळे सार्वजनिक गाऱ्हाण्याची निवेदने आमच्या कार्यक्रमात देता येणार नाहीत.'असे त्यांनी मला रागाने सुनावून झिडकारले.मी वादावादी न करता तडक कारवारला जाऊन खादी भंडारातून एक सुंदर असा गंधाचा हार (Sandal wood garland)विकत घेतला.

दुसऱ्या दिवशी नियोजित वेळी मंत्रिणबाई सरकारी लव्याजम्यासह आमच्या शाळेपुढील मैदानात घातलेल्या सुशोभित मंडपात स्वागत समारंभाच्या कार्यक्रमासाठी म्हणून हजर झाल्या.मी एका पिशवीत हार व निवेदन लपवून ठेवून प्रवेशद्वाराच्या बाहेरच ताटकळत उभा होतो. कृष्णा मास्तरांच माझ्याकडे लक्ष गेलं तेव्हा त्यांनी,''तू हवे तर कार्यक्रमासाठी आत येऊन बसू शकतोस पण तुझे निवेदन मात्र मंत्र्यांना देता येणार नाही'' असे मला समजावून सांगितले. ''मी तुमच्या कार्यक्रमावर बहिष्कार टाकतो.'' असे सांगून मी आत जाण्याचे टाळले. साधारण तासभराने कार्यक्रम संपवून मंत्रीणबाई आपल्या घोळक्यासह मंडपातून बाहेर पडून आपल्या गाडीकडे निघाल्या.ती संधी साधून मी पिशवीतला चंदनाचा हार झट् करून त्यांच्या गळ्यात घातला व त्यांना वाकून नमस्कार केला. त्यांच्याबरोबर दोन निवडणूक प्रचारात आमच्या गावी काम केले होते म्हणून त्यांनी मला ओळखले. माझ्याशी त्या चार शब्द बोलल्या व माझे नाव आठवत नसल्याबद्दल क्षमा मागितली. त्या क्षणी मी निवेदन त्यांच्याकडे दिले त्यांनी ते निवेदन वाचून,''मी नक्कीच हे काम करीन'' असे आश्वासन दिले ते बघून कृष्णा मास्तर यांचे तोंड खर्रर करून उतरले. माझे धाडस पाहून आजूबाजूचे लोक व माझ्याबरोबर आलेली काही ग्रामस्थ मंडळी प्रभावित झाली.

साधारण दोन महिन्यानी मला व्हायोलेट आलवा यांच्याकडून पत्र आले त्यात त्यांनी माझे निवेदन कर्नाटक राज्याचे संबंधित बांधकाममंत्री श्री रामकृष्ण हेगडे यांना पाठवून दिल्याचे नमूद केले होते. काही महिन्यांनी ग्रामपंचायतीचे सेक्रेटरी असलेले श्री. गुणा पडती मला शोधत घरी आले. पंचायतीच्या कार्यालयात मंत्रीमहोदय श्री. रामकृष्ण हेगडे आलेले असून तिथे तुम्हाला ताबडतोब बोलावले आहे असे त्यांनी सांगितले. चावडीवर व तेही मंत्र्याने बोलावले आहे हे समजल्यावर घरातील मंडळी घाबरून गेली. मला मात्र रास्त अंदाज आला म्हणून मी पेटीतून आलवाबाई यांच्याकडून आलेले पत्र व निवेदनाची प्रत घेऊन ग्रामचावडीवर पोहचलो.

चावडीवर पोहचलो तेव्हा मंत्रीमहोदयांनी आपल्या सचिवाला सांगून संबंधित कागदपत्रे बाहेर काढायला सांगितले. त्यात मी केंद्रिय मंत्री श्रीमती व्हायोलेट आलवा यांना दिलेले निवेदन व सोबत त्यांनी श्री. रामकृष्ण हेगडे यांना लिहीलेले पत्र, तसेच कडवाड नदीवर पूल बांधण्यासाठी संबंधित कार्यालयाला

काढलेली ऑर्डर असे कागद होते. मंत्रीमहोदयांच्या चिटणीसांनी ती कागदपत्रे ग्रामपंचायतीच्या सरपंच यांच्याकडे दिली.सरपंचानी ती आनंदाची बातमी पंचायतीचे सभासद व जमलेल्या अन्य जनसमुदायाला दिली.तेव्हा सर्वजण आश्चर्यचकित व आनंदित झाले. श्री.रामकृष्ण हेगडे यांनी मला त्यांच्या जीपमध्ये बसवून घेऊन नदीचे पात्र बघण्यासाठी म्हणून निघाले. त्यांच्या आगे-मागे सरकारी फौज-फाटा व अन्य गावकरी मोठ्या संख्येने होते. त्यावेळी सुकतीची (ओहोटी) वेळ असल्यामुळे अनेकजण गुडघाभर चिखलातून व रेतीतून ये-जा करीत होते.ते पाहून श्री.रामकृष्ण हेगडे यांनी,''आपण जातीने त्याबाबत लक्ष घालून लवकरात लवकर हा प्रकल्प पूर्ण करू''असे आश्वासन दिले.

२९

मध्यंतरी दोन तीन वर्षे निघून गेली. मी मुंबईला नशीब अजमावण्यासाठी म्हणून निघून गेलो. मी गावी नसताना पुलाचे काम पूर्ण झाले व त्याचे उद्‌घाटन श्री.रामकृष्ण हेगडे यांच्या हस्ते करण्यात आले. तशा स्वरूपाचा शिलालेख नदीकिनाऱ्यावर बसविण्यात आलेला आहे. पुलाचे उद्‌घाटन झाल्यानंतर केलेल्या भाषणात श्री. रामकृष्ण हेगडे यांनी केलेल्या भाषणात ''प्रकल्पाला गावातल्या एका मुलाने चालना दिली होती.''याची आठवण काढली. पण त्यांना माझे नाव आठवत नव्हते. पुढे श्री.रामकृष्ण हेगडे कर्नाटक राज्याचे मुख्यमंत्री झाले.कालांतराने ते केंद्रीय योजना आयोगाचे उपाध्यक्ष झाले. त्यावेळी मी ''इंडो-अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स '' या संस्थेत नोकरीला होतो. एकदा मी कार्यालयीन कामानिमित्त मुंबई ते दिल्ली विमानाने जाणार होतो. मी माझ्या आसनावर जाऊन बसल्यानंतर काही वेळाने विमान सुटता सुटता एक व्यक्ती माझ्या बाजूच्या आसनावर येऊन बसली. मी त्यांच्याकडे वळून बघितल्यावर ते श्री. रामकृष्ण हेगडे आहेत हे मी ओळखले. मी त्यांना माझे व्हिजीटिंग कार्ड देऊन कडवाड गावी झालेली भेट व पुलासंबंधीचा विषय यांची आठवण करून दिली. आश्चर्याची गोष्ट म्हणजे तो प्रसंग त्यांच्या स्मरणात होता. पुढे दिल्ली विमानतळ येईपर्यंत आम्हा उभयतांचे कन्नड मधून अनेक विषयांवर चर्चा झाली. त्यात ''कोकण रेल्वे'चा विषय पण निघाला. तेव्हा श्री. रामकृष्ण हेगडे यांनी, ''मी योजना आयोगाचा उपाध्यक्ष; रेल्वे मंत्री श्री. जार्ज फर्नांडिस व अर्थमंत्री श्री. मधू दंडवते हे तिघेही कोकणपुत्र असून हा अतिशय अवघड असलेला प्रकल्प मार्गी लावण्यासाठी म्हणून

प्रयत्नशील असल्याचे सांगितले. अनेक वर्षांच्या नंतर जेव्हा कोकण रेल्वे सुरू झाली तेव्हा मला श्री. हेगडे यांच्याशी झालेल्या संवादाची आठवण झाली. खरोखरीच कोकण रेल्वे निर्माण झाल्याचे श्रेय- श्री.रामकृष्ण हेगडे, श्री.जॉर्ज फर्नांडिस व श्री.मधू दंडवते या त्रिमूर्तीला जाते.

३०

शनिवारी अर्धा दिवस शाळा असायची. त्यामुळे मी शाळेतून तडक घरी (कडवाडला) जात असे. शनिवार -रविवार घरी राहून सोमव.री सकाळी थेट शाळेत जायचो. त्यावेळी मला कडवाडहून शाळेत ये-जा करणारे अन्य सहकारी यांची भेट व्हायची. एकदा असेच त्या ग्रुपबरोबर शाळेला जात असताना सदानंद बांदेकर याने मराठीतील ख्यातकीर्त विनोदी लेखक, श्री. दत्तू बांदेकर आपल्याकडे येऊन गेल्याचे सांगितले. मी आचार्य अत्रे संपादित करीत असलेले 'नवयुग' हे साप्ताहिक नियमितपणे वाचीत असे. त्यामुळे श्री. दत्तू बांदेकर यांच्या विनोदी लिखाणाशी मी परिचित होतो. त्यांचे ''सख्या हरी'' हे सदर तर धमाल उडवून द्यायचे. ते बाड येथे कुठेतरी राहतात असे समजल्यावर तपास करून त्यांना जाऊन भेटलो. मी सुंकेरी येथील वाचनालयात येत असलेली सर्व मराठी मासिके व वर्तमानपत्रे बारकाईने वाचत होतो. त्या ग्रंथ संग्रहालयात अनेक उत्तम मराठी ग्रंथ पण होते,नी ते सर्व ग्रंथ अधाशाप्रमाणे वाचून काढले होते.कडवाडसारख्या एका खेड्यात राहणाऱ्या मुलाला मराठी साहित्याच्या वाचनाची असलेली आवड पाहून बांदेकर प्रसन्नचित्त झाले. पुढे काही वर्षानी मी मुंबईला गेल्यानंतर नवयुग कार्यालयात मी दत्तू बांदेकरांची भेट घेऊन जुनी ओळख करून दिली.ते गिरगांवातील ''नवाकाळ''कार्यालयाजवळील एका चाळीत राहत असल्याची आठवण आहे.चाळीत त्यांच्या समोरासमोर अशा दोन खोल्या होत्या एका खोलीत ते आपले लेखन-वाचन करीत, पाहुण्यांच्या गाठी-भेटी पण त्याच खोलीत पार पडत असत. पुढील खोलीत त्यांचे कुटुंब राहात असे.

३१

एकदा कडवाडला आलो तर आई प्रसूती वेदनांनी तळमळत होती. थोड्याच वेळात तिला मुलगा झाला. तोच आनंदराय. गोरा-गोरा, गोल चेहऱ्याचा असा तो बाळसेदार मुलगा होता. तो मंदबुद्धीचा निघाला. त्यामुळे त्याची शिक्षणात प्रगती झाली नाही. लहानपणी तो एकदा माडीवरून गडगडत खाली पडला

होता, त्यामुळे त्याच्या मेंदुला इजा झाली असावी असे अनेक वर्षांनंतर आई सांगत होती.

त्या वेळी आमची शाळा सकाळ व संध्याकाळ दोन सत्रांत चालत असे. एक दिवस सकाळी आम्ही काही मुले गप्पा मारीत शाळेत निघालो असताना नंदनगद्दे गावाजवळील ''तीन कारे '' (तीन कार्यांची झाडे) या ठिकाणापर्यंत पोचलो. तेव्हा समोरून मुकुंद मास्तर व अन्य काही विद्यार्थी डोक्यावरील टोपी काढून दु:खीत चेहऱ्याने शाळेतून परतत असलेले दिसले. घाबरुन आम्ही स्तब्ध उभे राहिलो. मुकुंद मास्तर यांनी सांगितले, ''काल संध्याकाळी दिल्ली येथे महात्मा गांधी यांची हत्या झाली. शाळा बंद असणार. तुम्ही परत जा.''गांधीजी व त्यांच्या कार्याबद्दल आम्ही बरचं ऐकून होतो तसेच वर्तमानपत्रातून, रेडिओवरून त्यांच्याबद्दल अनेक गोष्टी ऐकलेल्या होत्या. त्यावेळी आम्हाला राजकारणाबद्दल जास्त माहिती नव्हती. तरीही महात्मा गांधी म्हणजे थोर पुरुष आहेत एवढे समजत असे. आम्ही पण टोप्या काढून घेऊन ग्लान वदनाने घरी परतलो.पुढे काही वर्षांनी दिल्लीला गेल्या वेळी मी आवर्जून तिथल्या बिर्ला मंदिराला (लक्ष्मीनारायण मंदिर) भेट दिली व गांधी हत्या झालेल्या स्थळाला भेट दिली प्रार्थनेसाठी म्हणून गांधीजी ज्या खोलीतून निघून काही अंतरावर असलेल्या मंचापर्यंत जायला निघाले तेव्हा गर्दीत लपलेल्या नथुराम गोडसे याने पुढे येऊन त्यांच्यावर तीन गोळ्या झाडून त्यांची हत्या केली. ज्या खोलीतून निघून गांधीजी प्रार्थनास्थळापर्यंत पोहचेपर्यंतच्या वाटेवर जिथे पावलांचे ठसे उमटले होते तिथे आता फरशीची पाऊले चिकटवून ठेवलेली आहेत.

लक्ष्मी नारायण मंदिरातील मैदान लहान असल्यामुळे अंत्यसंस्कारासाठी गांधीजींचा देह नवी दिल्ली शहराच्या बाहेर असलेल्या 'राजघाट'या स्थळावर नेण्यात येऊन तेथे त्यांच्यावर सरकारी इतमामाने अंत्यसंस्कार करण्यात आले. त्या जागेवर मोठी अशी समाधी बांधण्यात आली असून त्यावर गांधीजींनी उच्चारलेले शेवटचे शब्द ''हरे राम'' कोरलेले आहेत. जगभरातील मुत्सदी, राष्ट्राध्यक्ष, पंतप्रधान दिल्लीला आले की त्यांची पहिली भेट राजघाट वरील गांधी स्मारकाला आयोजित केली जाते. याच स्मारकाच्या बाजूलाच ''गांधी स्मारक''नावाचे मोठे संग्रहालय उभारलेले आहे. त्यात गांधीजी वापरत असलेले व त्यांच्या संबंधित असलेल्या हजारो वस्तू ठेवण्यात आलेल्या आहेत. त्यात

एक दालन गांधीजींना आलेल्या पत्रांचे आहे. त्यात एका खेडूताने गांधीजींना लिहीलेले पोस्ट कार्ड आहे. त्यावर ''गांधीजीस् - जिथे असतील तिथे'' असा पत्ता लिहिलेला आहे. आश्चर्याची गोष्ट म्हणजे पोस्ट खात्याने ते पत्र व्यवस्थितपणे पोचते केलेले आहे. पोस्ट खात्याने आपल्या कामकाजाची माहिती लोकांना माहित व्हावी म्हणून एक Documentary निर्माण केलेली आहे. त्यात त्यांनी या गोष्टीचा उल्लेख अभिमानाने केलेला असून त्यात सदर पोस्ट कार्डाचे छायाचित्र दाखविलेले आहे.

## ३२

सुंकेरीला रोज सायंकाळी क्रिकेटचा खेळ जमत असे. बाबूराय, पुतू, आचार्य (आचा), प्रभाकर, मधुकर, नानू, रमाकांत, विश्वनाथ, पद्माकर, मोहन, रत्नाकर, दिनेश, यशवंत, नरसिंह, जगदीश, किशोर, कृष्णानंद, उमेश, गणपतराय व अन्य बरीच मंडळी असायची. व्यंकटरमण मठासमोरील मोकळ्या जागेत जोरदारपणे क्रिकेटचा खेळ रंगत असे. काही जण बाजूच्याच मोकळ्या जागेत फूटबॉल किंवा हॉलीबॉल खेळत असत. कठीणकोण, मराठवाडा, नंदनगद्दा येथील अन्य संघांच्या विरूद्ध आमची क्रिकेटची मॅच चाले. त्यात कधी हार, तर कधी जीत होई.

मी गावी असेपर्यंत स्थानिक पद्धतीप्रमाणे आजारपणात सर्वसाधारणपणे गावठी औषधेच घेत होतो. त्यावेळी तशीच वहीवाट होती. कुणाला सर्दी खोकला झाला की तुळशीच्या पानांच्या रसामध्ये काळी मिरी, सुंठ, मीठ व साखर घालून काढा बनवून देत असत. कोणाचा घसा दुखला तर त्याला खायच्या पानावर (विड्याचे पान) पातळ गूळ व चुना चोळून ते पान दिव्यावर गरम करून त्याचे गळ्याला पोटीस बांधत असत. गालगुंड झाले असेल तर सहाणीवर रक्तचंदनाचे खोड झरवून त्याचा लेप लावीत असत. खरूज झाली असल्यास गाईच्या मुताने खरूज धूत. मग त्यावर उगाळलेले गंध लावीत. कोणी आपटून किंवा पाय घसरून खाली पडल्यावर खोक पडली (जखम झाली) तर त्यात कोळीष्टके भरीत. डोके दुखीवर अकसीर इलाज म्हणजे गाईचे जुने तूप कपाळावर चोळायचे. कोणाला व्यवस्थित झोप लागत नसल्यास त्याच्या डोक्यावर खोबरेल तेल थापून त्यावर भले मोठे असे एरंडाचे पान ठेवीत असत. अशाप्रकारचे अनेक उपचार आजही खेड्यापाड्यातून चालतात.

सुंकेरीला गोपाळकृष्ण देवालय तसेच शेजारील व्यंकटरमण मठात रथोत्सव मोठ्या उत्साहाने साजरा केला जातो. दोन्ही देवळातील रथोत्सव एकाच दिवशी होऊ नये म्हणून व्यकटरमण देवाचा रथोत्सव रथसप्तमीला; तर गोपाळकृष्ण देवाचा रथोत्सव माघ महिन्याच्या पौर्णिमेला साजरा केला जातो. त्या वेळी हजारो लोकांना अन्नसंतर्पण केले जाते. त्याचप्रमाणे दोन्ही देवालयांच्या तर्फे लांब शेतात वेगवेगळ्या दिवशी वनभोजनाचा समारंभ पार पाडतात.

गणपती उत्सव कोकणात पूर्वापार परंपरेने घरोघरी चाले. माझ्या लहानपणी गणपतीचा सार्वजनिक उत्सव होत नसे. आता मुंबईहून परतलेल्या काही जणांनी कारवारसारख्या मोठ्या शहरात सार्वजनिक गणेशोत्सव साजरा करायला प्रारंभ केला आहे. रत्नाकर यांच्या घरी पाच दिवसांचा गणेशोत्सव चाले. यशवंत बांदेकर नावाचे गृहस्थ सुंकेरीत सुंदर गणेशमूर्ती करण्याबाबत प्रख्यात होते. यशवंत बांदेकर व बाबाप्पा यांची लहानपणापासूनची मैत्री. त्यामुळे रत्नाकरच्या धरची गणेशमूर्ती तो विशेष प्रेमाने बनवायचा. रत्नाकर वेगवेगळ्या कॅलेंडर्सवर असणाऱ्या गणेश मूर्तीच्याप्रमाणे आपल्या घरातील मूर्ती असावी असा आग्रह धरी व तशी मूर्ती यशवंतकडून घडवून घेई.

३ ३

काळी नदीच्या किनारी बाबाप्पाची मोठी नारळाची बाग होती. त्या बागेच्या कडेवर त्यांनी सिमेंट क्राँकेटचे दोन संडास बांधून घेतले होते. ही नारळाची बाग त्यांच्या घरापासून बरीच लांब असल्यामुळे तिथल्या देखरेखीसाठी ओमू भोय व भिकारो भोय अशा दोघांना झोपड्या बांधून दिलेल्या होत्या. त्यात ते दोघेही आपल्या कुटुंबियांच्या समवेत राहत. नारळाच्या बागेची देखभाल याशिवाय ते दोघेही नदीवर जाऊन मासे धरून आणीत. त्यांच्या बायकामुले मग ती मासळी गावभर नेऊन विकत असत.

पावसाळ्यातील चार महिन्यात मैदानी खेळ खेळणे अशक्य होत असे. त्यावेळी मुले व मुली मिळून गोपालकृष्ण देवालयातील सभामंडपात किंवा व्यंकटरमण मठ येथील सभागृहात अनेक तऱ्हेचे बैठे खेळ खेळत असत. या खेळात मुले विरूद्ध मुली अशी चढाओढ असे. सागरगोटे, गजगे, ताबूलफळे, गुडफळे इ. खेळ चालत. आमच्यापेक्षा मोठ्या असलेल्या मुलांनी कॅरमबोर्ड आणला होता. त्यांचा खेळ वेगळा चाले. गोपाळकृष्ण देवालयात सायंकाळी काही जण

मिळून तासभर भजनांचा कार्यक्रम करीत. त्यावेळी मराठी व कन्नड भक्तीगीते म्हटली जात. कन्नड भक्ती गीतात पुरंदरदास या कन्नड संताची गीते जास्त प्रमाणात असायची पुरंदर दासांच्या अनेक गीते ही ''कानडा विठ्ठल'' या पंढरपुरमधील देवावर आधारित आहेत. या भजनाच्या कार्यक्रमात श्रीकांत, त्याचा भाऊ मनोहर, बहीण शकुंतला व मी उत्साहाने भाग घेत असू त्या भजनांच्या मुळे मला भक्तीगीतांची गोडी लागली

३४

कारवार येथील एकमेव सिनेमा थिएटर म्हणजे ''शिरीन टॉकीज'' त्याचे मालक श्री. नरहरी बोरकर हे नवनवीन मराठी व हिंदी चित्रपट लावीत असत. ''संत तुकाराम'', ''संत तुलसीदास'' अशा प्रकारचे भक्तीप्रधान चित्रपट मी अगदी लहानपणी तिथे पाहिलेले माझ्या आठवणीत आहेत. त्यावेळी मी ४-५ वर्षांचा असेन. कडवाडहून काही स्त्रिया लहान मुलांच्यासह अशा भक्तीरसप्रधान चित्रपटांसाठी आवर्जून कारवारला जात असत. कडवाड ते कारवार जाऊन यायचं म्हणजे पंधरा मैलाचा प्रवास असे. नदी ओलांडून जाण्याचा त्रास वाचवावा व परत येताना 'तर' (नाव) रात्री आठ वाजताच बंद होते म्हणून हा संपूर्ण प्रवास लांबच्या डोंगराळ वाटेने -कडवाड, मखेरी, शिरवाड, शेजवाड, भांडीशिट्टा, हब्बुवाडा व कारवार असा चाले त्यावेळी विद्युतशक्ती नसल्यामुळे एका मोठ्या जनरेटरच्या मदतीने वीज निर्माण करून चित्रपट दाखवला जाई मी आयुष्यात पहिल्यांदाच विजेचा दिवा शिरीन टॉकीजमध्ये पाहिला. पुढे मोठा झाल्यावर व विशेषत. बाड येथील इंग्रजी शाळेत जायला लागल्यावर काही मित्रांच्या समवेत कारवारला जाऊन हिंदी व इंग्रजी चित्रपट पाहिलेले आहेत. आता कारवार येथे तीन चित्रपटगृहे व एक टुरिंग टॉकीज आहे

वर्षातून एकदा कारवारला सर्कस यायची न चुकता आम्ही बाळगोपाळ मंडळी सर्कशीचे खेळ बघत असू. त्यातील 'टिंबू-लिंबू' व 'बटाटू - टमाटू' अशी मजेदार नावे असलेली विदूषक मंडळी यांच्या आचरट कसरती पाहून आम्ही खदखदून हसायचो मग सुट्टीत लहान मुलांना जमवून आम्ही ''सर्कस-सर्कस'' खेळ खेळत असू कधी कधी महाराष्ट्रातून नामांकित नाटकमंडळी करवारला येऊन१०-१५ दिवसांचा मुक्कामात आपले खेळ दाखवीत असत बाल गंधर्वांची कंपनी जेव्हा कारवारला नाटक सादर करायला येई त्यावेळी प्रेक्षकांची तुडुंब गर्दी

होई. ती नाटके पाहता यावी म्हणून काही जण आपले दागिने किंवा कोयते, विळे इ. हत्यारे सावकाराकडे गहाण ठेऊन पैसे आणीत. कारवारच्या आजूबाजूच्या लोकांची सांस्कृतिक करमणूक म्हणजे यक्षगान, नाटके,भजने-कीर्तने,पुराणे अशा प्रकारची मौज होती. त्यामुळे तिथल्या लोकांना गायन-वादन व नाटकाचे वेड लागले होते.

३५

मी सुंकेरीला शिक्षणासाठी असताना भारताला स्वातंत्र्य मिळाले. १५ ऑगस्ट, १९४७ या दिवसाच्या पूर्व रात्रीला सर्व जणांनी जागरण केले. ठिकठिकाणच्या देवळांतून व इगर्जीतून (चर्च) ठीक रात्री बारा वाजता घंटानाद करण्यात आला. लोकांनी फटाके उडवून, दीपावली सारखी रोषणाई करून आपला आनंद व्यक्त केला. सकाळी सहा वाजता कारवार तालुक्यातील सर्व गावांहून मिरवणुकीने निघून लोकांनी सकाळी दहा वाजेपर्यंत कारवार येथील भव्य पोलीस पंटागणात जमावे असे ठरले. त्यानुसार सकाळी सहा वाजता वाजंत्र्यांच्या मेळ्यासहित साधारण तीनशे जणांचा घोळका राष्ट्रध्वज फडकावीत, अनेक रंगीबेरंगी पताका फडकावीत अबदागिरी घेऊन मिरवत निघालो.

मिरवणूक श्री. विश्वनाथ नायक यांच्या घराजवळ पोचताच त्यांनी सर्वांना मिठाई देऊन लोकांचे तोंड गोड केले. श्री. विश्वनाथ नायक हे मोठे फॉरेस्ट कॉन्ट्रॅक्टर होते. त्यामुळे ते आमच्या समाजातील व गावातील प्रतिष्ठित व सधन गृहस्थ गणले जात. त्यांचा मुलगा दिनेश व त्यांचे तीन भाचे आमच्याबरोबर क्रिकेट खेळायला येत असत. त्या मिरवणुकीत सहभागी होण्यासाठी श्री. विश्वनाथ नायक यांनी आपला एक हत्ती सुशोभित करून ठेवला होता. त्या हत्तीवर कुणीतरी बसून हातात तिरंगा ध्वज धरावा असे ठरले. पण कोणीही हत्तीवर बसायला तयार नव्हते.मी धैर्याने पुढे झालो.माहूताने हत्ती खाली बसवून लहानशी शिडी लावली.मी माहूताच्या मदतीने हत्तीवर चढून बसलो व हातात तिरंगा झेंडा घेतला.त्यावेळी शिट्ट्या वाजवून व टाळ्यांचा गजर करुन माझे स्वागत केले गेले. हत्ती संथगतीने चालत होता. तरीही अंगाला हिसके बसत. एका जाड दोराला घट्ट धरून बसावे लागे. मी कधी ह्या हातात तर कधी त्या हातात झेंडा पकडून पुढील प्रवास केला. आम्ही पोलीस ग्राऊंडवर पोचलो. प्रचंड जनसमुदाय तिथे जमला होता. पोलीस बँड पथक देशभक्तीपर गीते वाजवीत होते. अनेक

नेत्यांची समयोचित भाषणे झाल्यावर मुख्य कार्यक्रम संपला व आम्ही घरोघरी पोचलो तेव्हा दुपारचे तीन वाजले होते.

३६

आमच्या भावंडांतील सर्वात लहान भावंड म्हणजे राधाकृष्ण. त्याचा जन्म १९५२ साली झाला त्याच वर्षी मी एस्. एस्. एल्. सी. ची परिक्षा पास केली होती. त्यावेळी मी सोळा वर्षाचा होतो. त्यामुळे माझ्यात आणि राधाकृष्ण यांच्यात सोळा वर्षाचा फरक आहे. राधाकृष्ण शेवटचे मूल असल्यामुळे त्याला सर्वजण ''शेंडेफळ'' असे म्हणत. सर्व भावंडांत राधाकृष्ण हा अंगाने बारीक व किडकिडीत होता. अजूनही तो तसाच आहे.

होडलोबाप्पा यांना नाना तऱ्हेची आयुर्वेदिक औषधे बनवून विकण्याचा नाद होता. कोहळ्याचा ''कूष्मांडपाक'', आवळ्यांचा ''चयवनप्राश'' व ''आवळकाठी'' इ. ते अनेक तऱ्हेची भस्मेपण तयार करीत. त्या कामांत त्यांना मदत करण्यासाठी सदाशिवगड जवळील ''बावळा'' या गावचे आमचे लांबचे नातेवाईक श्री. अच्युत कामत हे दरवर्षी न चुकता आमच्या घरी येत असत. मी पण त्या कामांत जमेल तेवढा हातभार लावी. त्यामुळे मला आयुर्वेदाची तोंडओळख झाली व त्यांच्या त्या विषयावरील चर्चा ऐकून बऱ्याच गोष्टी समजल्या. त्यापैकी जलचित्किचेचे फायदे मला समजले तेव्हापासून मी भरपूर पाणी प्यायला सुरूवात केली त्याचा मला अनेक रीतीने फायदा झाला.

३७

माझे चुलत बंधू दादा यांचे लग्न अंकोला तालुक्यातील ''गुंडबाळा'' या गावातील श्री. म्हाळप्पा पै यांची थोरली मुलगी अमरावती यांच्याबरोबर पार पडले. त्या लग्नाच्यावेळी मी पाच वर्षाचा होतो लग्न उन्हाळ्यात होते म्हणून वऱ्हाडी मंडळी गावाजवळील नदी 'पार' येथे आंघोळ व कपडे धुण्यासाठी म्हणून जात असत. ज्यांना गरम पाण्याच्या आंघोळीची सवय होती त्यांच्यासाठी घरी वेगळी व्यवस्था करण्यात आली होती त्या ''पारा'' चे पाणी स्वच्छ, जास्त खोल नसलेले व झुळूझुळू वाहणारे होते जरा मोठी असलेली मुले खोल पाण्याची जागा बघून आंघोळीसाठी म्हणून उतरली होते त्यात एके ठिकाणी प्रवाह जोरदारपणे वाहत होता.तिथे पोहत असलेले माझे चुलत बंधू गोविंदअण्णा त्या प्रवाहात वाहून गेले.सर्वत्र बोंबाबोब झाली. कुणीतरी त्या डोहात उडी मारून

गोविंद अण्णाला खेचून बाहेर आणले म्हणून तो बचावला. नववधूचे रूक्माबाई असे नामकरण करण्यात आले.

आमच्या गावी वहिनीला ''होनि'' म्हणायची पद्धत होती. त्यामुळे दादाच्या बायकोला आम्ही सर्वजण ''होनि'' म्हणूनच हाक मारत असू. रामानंद जन्मल्यानंतर साधारण आठ महिन्याच्या अंतराने दादाला प्रेमानंद हा मुलगा झाला. काही वर्षांच्या अंतराने प्रेमानंदाचा धाकटा भाऊ अशोक हा जन्माला आला. सध्या दोघेही भाऊ मुंबईत सांताक्रूझ येथे राहतात. रामानंद व प्रेमानंद हे समवयस्कर असल्यामुळे सुरूवातीपासून एस.एस. एल्. सी. पास होईपर्यंतचे त्यांचे शिक्षण बरोबरीने पार पडले.

सुंकेरीतील भिकारबाप्पा व मावशी यांचा एकमेव मुलगा विष्णू (विष्णूअण्णा) विवाहयोग्य झाला होता. तो भटजीपणाचे सर्व मंत्र व तंत्र शिकला होता. त्यांच्यासाठी वधू संशोधन जोरात चालू होते. अकस्मात एक दिवस त्याला उलट्या होऊ लागल्या. गावठी औषधाने उतारा पडेना म्हणून डॉक्टरचे इलाज सुरू करण्यात आले पण त्या वेळेपर्यंत त्याला झालेली कावीळ अंगभर पसरली होती. त्यातच त्याचा अंत झाला. विष्णूअण्णा स्वभावाने प्रेमळ व खेळकर असा होता. मावशी तर त्या धक्कयातून खूपच कळवळली होती. बरेच दिवस आम्हाला विष्णूअण्णाची याद सतावत होती.

३८

माझी मुंज करायची धांदल उडाली. माघ महिन्यातील रथोत्सवाजवळील दशमीचा मूहर्त नक्की करण्यात आला. नवमीला''मोठ्या रथाचा'' उत्सव असतो. नवमीचा मोठ्या रथाचा उत्सव बघता यावा या उद्देशाने बाप्पाच्या आमंत्रणावरून आमचे दूरदूरचे नातेवाईक अष्टमीच्या दिवशीच आमच्या घरी येऊन पोचले होते. मुंबईहून आईचे मामा नागप्पमाम व सुबडमाम (सुबरायमाम) त्यांच्यामोठ्या कुटुंबासह आले होते. तेकणकेरीहून गंगामावशी सहकुटुंब आली होती. अंकोल्याहून काशी मामाची पत्नी (काशी मामी) व दुसरे मामा येसूमामा (यशवंत माम) व त्यांचे कुटुंब; केरेकट्टेहून आईची मावशी गंगामावशी, होन्नावरून पोरी मावशी व तिचे कुटुंब तसेच हनुमट्टा येथून मोगऱ्याका (आत्या) व तिची मुलेपण आली होती. त्यामुळे आमचे घर पाहुण्यांनी भरगच्च भरले होते.

दोन घरांच्या मधोमध श्री. मारुतीचे देऊळ आहे. देऊळाच्या चारी

बाजूंनी प्रशस्त अंगणे आहेत. त्या चारही अंगणात माडाच्या झावळाचे मांडव घालून रंगीबेरंगी कपड्याची झालर लावून सुशोभित करण्यात आले होते. आंब्यांच्या डहाळ्यांची तोरणे जिथे तिथे लटकत होती. मुख्य प्रवेशद्वारावर दोन्ही बाजूंनी केळीचे खांब उभारून फुलांच्या व आंब्यांच्या पानांच्या तोरणांनी ते सुशोभित केले होते. मुंजीला साधारण महिनाभर असताना पूर्वतयारीला सुरूवात झाली. धान्य निवडणे, टिपणे, पीठ दळणे, पापड, वड्या, कुरड्या करणे, घर व अंगणे सारविणे अशी कामे सुरू झाली. देऊळाच्या मागील बाजूच्या अंगणात मोठमोठ्याल्या दगडी चुली उभारण्यात आल्या. मुंजीला आठ दिवस शिल्लक असताना लाडू, मांडे(चवडे), शेव, करे (तिखट शेव) इ. डब्बे भरभरून ठेवण्यात आले. त्यावेळची आमची घरची सांपत्तिक स्थिती बऱ्यापैकी होती. घरातील पहिलेच कार्य असल्यामुळे बाप्पाने सढळ हाताने माझी मुंज साजरी केली. तशा प्रकारचा थाटामाटाचा समारंभ आमच्या घरी पुन्हा झाला नाही. मुंज पार पाडल्या नंतर दहा दिवस पाहुणे -राऊळे राहिले होते. त्यांना आजूबाजूची निसर्गरम्य ठिकाणे - ढणढणे, नंदीव्हाळ व अन्य प्रेक्षणीय स्थळे दाखविण्यासाठी आमचे रयत असलेले लिंगा, पाटू इ. मंडळींची नियुक्ती करण्यात आली होती.

३९

आम्हांला दरसाल दोन कुंभ उत्पन्नाची भाताची जमीन होती. ती वेगवेगळ्या कुळांना खंडणीच्या रूपाने देण्यात आली होती. दरसाल कुळांना आम्हांला ठरलेली खंडणी(भात) द्यावी लागे. शिरवाड या गावी आमच्या नारळाची मोठी बाग होती. भिक्षुकीचे उत्पन्न यथा तथा होते. दुसऱ्या बाजूने मुलांची संख्या वाढत होती. त्यामुळे उत्पन्न वाढविण्याच्या उद्देशाने अनेक तऱ्हेचे धंदे बाप्पाने करून पाहिले त्यांना सर्वांनी फसविले व ते कर्जाच्या फेऱ्यात सापडले. जमीनी विकून त्यानी कर्ज फेडले खरे, पण घरात गरिबीने शिरकाव केला. बऱ्याच वेळा विशेषतः पावसाळ्यात आमची खाण्यापिण्याची आबाळ होत असे. कारण पावसाळ्यात धार्मिक कृत्ये होत नसल्यामुळे बाप्पांना उत्पन्न मिळत नव्हते.

गरिबीमुळे मुलांना कपडे वर्षातून एकदाच, म्हणजे दिवाळीच्या वेळीच घेतले जायचे. वर्षभर ते पुरवून वापरावे लागायचे.एस्. एस्.एल्.सी पास होईपर्यंत माझे कपडे म्हणजे निळ्या रंगाची अर्धी चड्डी व हिरव्या रंगाचे अर्ध्या हाताचे पैरण. वर्षासाठी फक्त कपड्याची एकच जोडी. त्यामुळे वर्षभरात पैरण कॉलरजवळ

व चड्डी कुल्याजवळ फाटायची. आई मग ठिगळे लावून कशीबशी त्यांची डागडुजी करायची. डोक्यावरील सफेद टोपी तर घामाने पिवळी होऊन फाटल्यावरच नवी टोपी मिळत असे. पाठ्यपुस्तके नवी घेण्याचे परवडत नसल्यामुळे वरच्या वर्गातील पास झालेल्या मुलांची पुस्तके आणून ठीकठाक करून वापरली जायची. त्यावेळी शाळेची फी अल्प होती तरी ती भरणे शक्य होत नव्हते. शाळेने अर्धमाफी केलेली फी सुद्धा अनेक महिने तुंबलेली असे. मुंबई येथील ''गौड सारस्वत ब्राह्मण लीग'' या संस्थेतर्फे काही रक्कम कधी कधी फी साठी म्हणून प्राप्त होई. पण त्यासाठी अर्ज करण्याचा सोपस्कर पार पाडावा लागे. आजच्या मुलांना मिळणारी नवीकोरी व डझनवारी वह्या, शाळेचा युनिफॉर्म व अन्य सामान यांचा एक वर्षाचा खर्च म्हणजे माझ्या काळातील पहिली पासून एस्. एस्. एल्. सी. पास होण्याएवढा खर्च असतो.

४०

वडिलांनी सर्वप्रथम भाताची गिरणी घेऊन हंगामाच्या वेळी गावोगावी भटकण्याचा धंदा करून पाहिला. त्यांनी किन्नर या गावाजवळील बोरीबंदर येथे गिरणी घेऊन गेल्यावेळी तिथे बिऱ्हाड केले होते. त्यामुळे सुट्टीत मी व जान्हवी तेथे आईबरोबर रहायला गेलो होतो. तिथे असताना मला कुणीतरी लहानसा गुबगुबीत गोरापान असा ससा पाळण्यासाठी दिला होता. मी रोज त्याला आंघोळ घालून दूध-भात खायला देऊन सेवा करीत असे. तो घरभर व अंगणात मजेने फिरे. आमची कुणाची नजर नसल्याचे पाहून एक दिवस कुत्र्याने घास मारून त्याची मानगुटी पकडली व त्याला घेऊन तो झाडीत पळाला.

भाताच्या गिरणीत नुकसान झाले म्हणून वडिलांनी मग उसाचा रस काढण्याचे मशिन आणले. पुन्हा गावोगावी भटकंती सुरू झाली. ऊस मळणीचा हंगाम मे महिन्याच्या सुट्टीत असल्यामुळे मी किन्नर. हळगे , हुळगे, खारगे, जूग, केरवडी इ. ठिकाणी गेल्याची आठवण आहे. गावोगावी बिऱ्हाड करून रहावे लागे म्हणून एका स्वयंपाक्याची नेमणूक केली होती. दोन्ही धंद्यांत नुकसान झाल्यामुळे बाप्पाने आपली नजर शेती धंद्याकडे वळविली ''आमराई'' या गावात पाण्याचा पाट वाहत असलेली जमीन त्यांनी भाडेपट्ट्यावर घेतली व त्यात शेकडो खड्डे खोदून केळीची रोपे (कवाते) रोवले. पाण्याचा मुबलक साठा असल्यामुळे केळीची झाडे भराभर वाढून त्यांना घड लागले. माकडांचा उच्छाद व चोऱ्या यामुळे

केळीचे घड(घडाय) नापत्ता व्हायला लागले. तात्पर्य काय तर तीनही धंद्यात कर्जबाजारी होऊन बाप्पाने जमिनी विकल्या. आईच्या अंगावरील दागिने विकले जाऊन ती लंकेची पार्वती झाली. त्याबद्दल गावातील जाणते लोक ''भटाक तारू व गाबत्याला गोरु जमत नाही.'' असे सांगायचे.

४१

सुंकेरीला जसा मुलांचा तांडा होता तसाच मुलींचा पण गट होता. बेबी, सुमन, मालू, मोहिनी, ललिता, सुनंदा, पुष्पा, शीला, कुसुम इ. वेगवेगळे खेळ खेळत असत. मुलामुलींचा गट वयात येत असल्यामुळे त्यांच्यात परस्परांबद्दल आकर्षण वाटे व ते कधी कधी एकमेकांच्या अंगचटिला येण्याचा प्रयत्न करीत.

शाळेत दरसाल वार्षिक संमेलन होत असे. त्यात मी लहानसहान भूमिका केलेल्या आहेत. वर्षातून एकदा ''कॅम्प फायर'' शाळेच्या भव्य मैदानात भरवले जात असे. आग पेटवून त्याभोवती मनोरंजनाचे अनेक कार्यक्रम मोठी मुलं करून दाखवित. एका वर्षी मी विदूषकासारखा वेश करून वाकड्या तिकड्या उड्या मारून व अनेक चाळे करुन सर्वांना भरपेट हसविले. त्यानतर अनेक दिवसपर्यत मला मुले ''जोकर'' म्हणून टिंगल करीत असत.

कडवाडला गजाभट नावाचे क्ऱ्हाडे ब्राह्मण राहत. ते अतिशय रंगेल व हौशी होते. वर्षातून दोनदा ते मराठी नाटके सादर करायचे. कारवार जवळील अरबी समुद्रात कूर्मगड नावाचे एक मोठे द्वीप आहे. कूर्मगडावर निबिड रान होते व ते निर्जन होते. तिथे गजा भट नरसिंह जयंती साजरी करीत असत. त्यासाठी त्यांनी खास कोल्हापूरहून चांदीची भव्य अशी नरसिंह मूर्ती करवून आणली होती. त्या जत्रेच्या काही दिवस अगोदर ते कामगारांना एका मचव्यातून कूर्मगडावर घेऊन जात. तिथे बोट्या, नावा, मचवे, होड्या इ. जलमार्गाने येणाऱ्या लोकांसाठी उतरण्यासाठी व्यवस्थित धक्का बनवला जाई झाडांच्या फांद्या छाटून, रस्त्यावरील खड्यात मुरूम भरून व्यवस्थित वाट बनविली जायची. नरसिह मूर्तीची स्थापना उंच अशा ठिकाणी दगडाने बांधून काढलेल्या एका चबुतऱ्यावर स्थापन केली जायची बंदरापासून मूर्तीपर्यंत जाणाऱ्या-येणाऱ्यांना मधे-मधे जमून बसण्यासाठी म्हणून रानात मोकळी जागा तयार ठेवीत असत. कूर्मगडावरील जत्रेसाठी दोन दिवस असंख्य यात्रेकरू तिथे येत असल्यामुळे साहाजिकच दुकानदारांची पण गर्दी व्हायची दुकानदाराच्यासाठी म्हणून खास कापडाच्या व गोपणपाटाच्या

कनाती उभारल्या जात.

नरसिंह जयंतीच्या दिवशी सकाळीच मूर्ती उघड्या पालखीतून वाजंत्री, दिंडी–पताका इत्यादी लवाजम्यासह श्री.गजानन भट यांच्या घरापासून मिरवणूकीतून निघे. कडवाड बंदरातून अनेक मचव्यातून दुपारपर्यंत उत्सवमूर्ती सर्व भक्तगणांसह कूर्मगडावर पोहचे. तिथे विधीवत पूजा–अर्चा आटोपल्यावर दर्शनासाठी म्हणून लोकांच्या रांगा लागत. रस्त्याच्या मधोमध दोरी बांधून जाणाऱ्या व येणाऱ्या भक्तांसाठी वेगवेगळ्या वाटा तयार केलेल्या असायच्या. मूर्तीच्या पुढे एका बाजूला एका मागोमाग एक अशी भजनमंडळे आपल्या क्रमानुसार भजने पार पाडीत. रात्रभर दर्शनसोहळा व अखंड कीर्तन चाले. लोकांच्या सोईसाठी लॉन्चेस व फतेमाऱ्या सोडल्या जात. दुसऱ्या दिवशी सकाळी मूर्ती घेऊन सर्वजण परतीच्या मार्गावर चालायला लागत.परतीच्यां वाटेवर मूर्ती कोडीबागपर्यंत जलमार्गाने आणून मग तिथून काजूबाग, कारवार, हब्बूवाडा, शेजवाड, शिरवाड या मार्गाने गजाभट यांच्या घरापर्यंत आणली जाई. त्यामुळे जे लोक कूर्मगडावरील जत्रेसाठी जाऊ शकले नाहीत.त्यांना दर्शन मिळे. त्या रात्री महापूजा होई व उत्सवाची सांगता होई. दुसऱ्या दिवशी मूर्ती कारवार येथील बँकेच्या लॉकरमध्ये ठेवली जाई.

या उत्सवाची जाहिरात कारवारच्या आसपासच्या खेड्यांतून पोस्टर्सद्वारे केली जाई. गजाभट नाना रंगाची शाई व ड्रॉइंग पेपर आणून देत. आम्ही वाड्यावरील मुले आपापल्या ताकदीप्रमाणे पोस्टर्स रंगवून देत असू. त्यामुळे आम्हाला कूर्मगडावर जाण्यायेण्याचा प्रवास मोफत असे. शिवाय कूर्मगडावर उत्सवाच्या दिवशी दुपारचे व रात्रीचे जेवण दिले जाई. दुसऱ्या दिवशी दुपारचे व रात्रीचे जेवण गजाभट यांच्या घरीच पार पडे. मी ड्रॉइंगच्या दोन परीक्षा पास केल्यामुळे माझी पोस्टर्स सर्वांत उठून दिसायची. काही वर्षांपूर्वी श्री. गजाभट यांचे सर्पदंशाने दुःखद निधन झाले.

नंदनगद्दे येथील नागनाथ देवळाजवळ आजूबाजूच्या भागातून पाच देवांच्या पालख्या ठराविक दिवशी जमत. त्या उत्सवाला ''म्हातन'' असे म्हणत. तसेच बाडला दरवर्षी ''मणशैले कट्टे'' म्हणून प्रसिद्ध असलेल्या ठिकाणी जत्रा भरते. मी या सर्व उत्सवात उत्साहाने भाग घेई. मे महिन्याच्या सुट्टीत नंदनव्हाळ; ढणढणे,गुड्डेहळी, आजाद्वीप(अंजनीद्वीप) गोकर्ण इ. ठिकाणी सहली काढीत असू.

## जांबावली ते आंबीवली

### ४२

दिवाळीच्या सुट्टीत व मे महिन्याच्या सुट्टीच्या आमचा विशेषतः माझा व जान्हवीचा ठरलेला कार्यक्रम म्हणजे अंकोला तुालक्यातील तैंकणकेरी या उपनगरात राहणाऱ्या गंगा मावशीच्या घरी रहायला जाणे. तीन बहिणीत गंगा मावशी मोठी. लग्नानंतर ती रूक्मिणी माधव कामत झाली. तिच्यानंतर माझी आई (तारा) व शेवटची बहीण पोरी (कमला). पोरीमावशीचा होन्नावर येथील श्री. विठ्ठल मुडलगिरी भट यांच्याशी विवाह झाला होता. आमची आई व गंगामावशी या दोघीत फार प्रेमाचे मेतकूट जमलेले होते. त्या दोघींचे पोरीमावशीशी मात्र कधीच जमले नाही. त्याचे कारण म्हणजे पोरी मावशी ही अहंमन्य व हावरट स्वभावाची होती. तेंकणकेरीहून अंकोला बसस्टँडजवळून जायच्या रस्त्यावर केरेकट्टे नावाचे उपनगर आहे. तिथे आईची मावशी सुंदराबाई नाडकर्णी राहात असत. तिचे माहेरचे नाव गंगा. त्यामुळे अंकोला तालुक्यात आमच्या दोन गंगा मावश्या होत्या. त्यांना ओळखण्यासाठी म्हणून आम्ही ''तैकणकेरी गंगामावशी'' व ''केरेकट्टे गंगा मावशी'' असे त्यांना संबोधित असू.

तैकणकेरीला रहायला गेल्यावर आम्ही काही दिवस अंकोल्यातील उपनगर असलेल्या हनुमट्टा (हनुमानाचा कट्टा) तेथील महामाया देवस्थानाचे पुजारी असलेले श्री. श्रीनिवास भट(आत्याबाई मोगऱ्याकाचे यजमान) यांच्याकडे रहायला जात असू. माझ्या वडिलांना सर्वजण प्रेमाने 'बाबन' म्हणत असत. चार भावंडात मोगऱ्याक्का ही सर्वात लहान म्हणून ती सर्वाची लाडकी. ''बाबन दादाची मुले'' म्हणून ती आमचे लाड करी.

आमचे काशीनाथ (काशीमामा) नावाचे एक मामा अंकोल्यातील काकरमठजवळील नारायण मंदिराचे पुजारी. त्यांच्याकडे पण आम्ही काही दिवस रहायला जात असू. त्यांची मोठी मुलगी कल्याणी (प्रेमा) हिचा माझ्याशीच विवाह करून देणार म्हणून मामा-मामी सर्वाना उघडपणे सांगत असत. त्यामुळे मला त्यांच्याकडे रहाताना संकोचल्यासारखे वाटे. घरी परतल्यावर आई, ''काशीमामाकडे रहायला गेला होतास की नाही.'' विचारणार म्हणून मी त्यांच्याकडे एक-दोन दिवसच राही.

तैंकणकेरीला माझे व जान्हवीचे अतोनात लाड होत असत. गंगामावशीचे यजमान श्री. माधव कामत हे तरुण वयातच वारले होते. त्यांना बाबुराय

(रामकृष्ण), इंदिरा, बाबा (व्यंकटेश) व रमा अशी चार मुले. चारही जण आमच्यापेक्षा मोठे. ते सर्वजण कडवाडला आमच्या घरी येऊन काही दिवस राहात. परत जाताना आम्हाला घेऊन जात. त्यांच्याकडे आंबे, फणस यांची रेलचेल असे. अंकोल्याला ''ईषाडद'' नावाचे चवदार आंबे तासून त्याच्या फोड्या करून खायला देत. हापूस आंबा जसा रत्नागिरीचे वैशिष्ट्य. तसा 'ईषाडद' अंकोल्याचे वैशिष्ट्य. तशा प्रकारचा आंबा अन्य कोठेही मिळत नाही. हापूस आंब्यांच्या तोंडात मारील अशा तोडीचा तो चवदार आंबा आहे.

४३

आमच्या घरी गुढीपाडवा,नागपंचमी,गणपती उत्सव, अनंत चतुर्दशी, रामनवमी, हनुमान जयंती, गोकुळाष्टमी इत्यादी सणवार साजरे केले जात. हिवाळ्यात सूर्योदयापुर्वी मुगाच्या खिचडीचे जेवण असायचे. त्याला ''धर्नुमास'' असे म्हणत. कौरव पांडव यांच्यात अठरा दिवसांचे युद्ध झाले त्यावेळी उभय पक्षातील सैन्य सूर्योदयापूर्वी मुगाच्या खिचडीचे सेवन करून दिवसभराच्या लढाईसाठी सज्ज होत असत. त्याची आठवण म्हणून धर्नुमास साजरा केला जातो. गावातील लोकांनी धर्नुमासाचे ''धुंधुरमास'' असे नामकरण केले.

श्रावणी, वर्षभरातील अनेक श्राद्धे, म्हाळ (महालय) इत्यादी पण परंपरेने साजरे केले जात. प्रत्येक सणासाठी करण्यात येत असलेली पक्वान्ने ही ठरलेली असत. त्यामुळे सणवारांच्याकडे मुले डोळे लावून बसलेली असत. घरी किंवा जवळच्या नातेवाईकांच्याकडे लग्न –मुंजीसारखे कार्य निघाल्यास आम्हा बालगोपाळ मंडळीची चंगळ असायची.

४४

एकोणीशशे बावन्न साली मी एस्. एस्. एल्. सी. परीक्षा पास झालो तेव्हा फक्त सोळा वर्षांचा होतो. माझे काही सहाध्यायी कुमठा व धारवाड येथील कॉलेजमध्ये पुढील शिक्षणासाठी जाण्याची तयारी करू लागले. मी आईवडिलांना कॉलेजला पाठविण्याची विनंती केली.पण व्यर्थ! ''आणखी पुढे शिकविणे आम्हाला जमणार नाही. इतर मुलांचे शिक्षण व्हायचे आहे. लवकर नोकरी धर व घरी मदत कर.'' असा रूक्ष व व्यावहारिक सल्ला मिळाला. मी निराश व हताश झालो.

अठरा वर्षे पूर्ण झाल्याशिवाय सरकारी वा खाजगी नोकरी मिळणे शक्य नव्हते हे सत्य ''आ'' वासून समोर उभे होते. पुढील दोन वर्षे कशी

काढायची हा माझ्यापुढील यक्ष प्रश्न होता. त्यावर काही दिवसात एक तोडगा निघाला. आमच्या समाजाचे स्वामी गोकर्ण-पर्तगाळ मठाधीश, श्रीमत् द्वारकानाथतीर्थ स्वामी यांच्याकडे राहून संस्कृत व ज्योतिष शिकावे. मग पुढचं पुढे पाहू असे ठरले. त्याप्रमाणे मी गोव्यातील पर्तगाळ या गावी जाऊन स्वामींच्या मठात दाखल झालो त्यावेळी मठात अन्य तीन विद्यार्थी शिकायला आले होते दोन गोव्यातील व एक विद्यार्थी केरळातील कोची येथील होता. मी धरून आता ४ विद्यार्थी झालो नरसिंह शास्त्री नावाचे ज्येष्ठ भटजी आम्हाला शिकवित असत माझे संस्कृतचे ज्ञान चांगले आहे हे, पाहून त्यांनी मला अन्य विद्यार्थ्यांच्याबरोबर 'कौमुदी'' व ''रंघुवंश'' हे शिकवायला घेतले साधारण दहा महिने शिक्षण पूर्ण झाल्यावर काही कौटुंबिक अडचणीमुळे शास्त्रीबुवांना आपल्या गावीच रहावे लागले. त्यामुळे आमची शिकवणी बंद झाली. काही महिने दुसरे कोणी शास्त्री मिळतात का याची चौकशी स्वामीजींनी केली पण त्यात काही यश आले नाही मग स्वामींनी दररोज सायंकाळी स्वत: शिकवणी घ्यायला सुरूवात केली पण त्यांना भेटायला येणाऱ्या लोकाच्या कोंड्याळ्यामुळे आमचे शिक्षण पुढे सरकेनासे झाले.

स्वामींना आपल्या प्रवचनात संस्कृत उतारे, वचने, उद्धृत करताना मध्ये मध्ये इंग्रजी अवतरणे देण्याची हौस होती त्यानी देव, धर्म तत्वज्ञान यांसंबंधीची अनेक उत्तमोत्तम पुस्तके मागवून घेतली होती जेव्हा स्वामींना वेळ मिळे तेव्हा ते माझ्याकडून अशी पुस्तके वाचून घेत त्यातील विशेष व लक्षणीय अशा वाक्यं व अवतरणे मला वेगळ्या नोंदवहीत टिपून ठेवायला सांगत अशा अवतरणांचा चपखल उपयोग ते आपल्या प्रवचनातून करीत असत.

स्वामींच्या सोबत असताना त्यांच्या सोबत गोव्यातील अनेक देवस्थानातून व तिथल्या धनिकांच्या घरी राहण्याचा योग आला आयुष्यात पहिल्यादाच गोवा मी तपशीलवारपणे पाहिला गोव्यातील मुक्कामात मी पहिल्यांदा रेल्वे पाहिली बेळगाव-लोंढा मार्गावरून वास्को पर्यत त्यावेळी रेल्वे जात असे अठरा वर्षे पूर्ण झाल्यावर स्वामींची परवानगी घेऊन घरी परतलो त्यावेळी माझ्याजवळ दक्षिणेच्या रूपाने मिळालेले साधारण ३०० रुपये जमा झाले होते. त्यमाुळे घरी काही क़ाळ मजेत गेला मग ''नोकरी शोध'', नोकरी शोध'' असा घोषा सुरू झाला. वर्तमान पत्रांतील जाहिराती बघून मी इकडे तिकडे अर्ज

पाठवित असे. अर्ज करून करून माझा 'अर्जुन' झाला होता. पुढे काय करावे हे समजत नव्हते. कुरूक्षेत्रावर संभ्रमात पडलेल्या अर्जुनाला कृष्णासारखा सखा मार्गदर्शक लाभला होता. पण मला धीर देणारा किंवा सल्ला देणारा कोणीही पाठीराखा नव्हता.

मी सुंकेरीला शिकायला असताना श्री. कृष्ण भट यांची ओळख झाली होती. त्यांच्या वशील्याने कुमठ्यातील D.K.Motors या खाजगी कंपनीत असिस्टंट स्टोरकिपर म्हणून नोकरी लागली.दरमहा पगार ६० रु. होता.साधारण ८ ते १० महिन्यांची नोकरी झाल्यावर कुमठ्यात पसरलेल्या टायफाईडच्या साथीला मी बळी पडलो. त्या विषमज्वरातून सुखरूप बाहेर पडायला महिनाभर वेळ लागला.आजारपणामुळे माझी पहिली-वहिली नोकरी सुटली व मी गावी परतलो.

४५

न्यू हायस्कूलमध्ये शिकत असताना मी बाहेरून ''दक्षिण भारत हिंदी प्रचार सभा, मद्रास '' ही संस्था चालवीत असलेल्या हिंदी परीक्षांना बसत होतो. महात्मा गांधीनी देशभरात एक राष्ट्रभाषा असावी या उद्देशाने ही संस्था स्थापन केली होती. कारण द्राविडी भाषा (कन्नड, मल्ल्याळी, तेलगु व तामिळ) जाणणाऱ्या लोकांत हिंदीचा प्रसार वाढविल्याशिवाय उत्तर व दक्षिण भारतातील लोकांचे मनोमीलन होणार नाही अशी गांधीजींची रास्त अशी धारणा होती. या कामाला वाहून घेण्यासाठी म्हणून त्यांनी आपला पुत्र देवदास याला मद्रास येथे पाठविले होते. ''एक जननी, एक हृदय और एक भाषा'' हे त्या संस्थेचे बीद्रवाक्य होते. ही संस्था चालवित असलेल्या ''प्रथमा'', ''मध्यमा'' व ''राष्ट्रभाषा'' अशा तीन परीक्षा मी उत्तम रितीने पार पाडल्या. त्यानंतरच्या ''प्रवेशिका'' परीक्षेचे केंद्र कारवारला नव्हते. त्याऐवजी ते केंद्र अंकोला येथे होते. अंकोल्याला जाऊन मी लेखी परीक्षा दिली. तोंडी परिक्षेला १५ दिवसांचा अवधी होता म्हणून मी घरी परतलो. ऐन परीक्षेच्या वेळी मी जोरदार ताप व कांजण्या यांच्या आजाराने अडकून पडलो. अंगभर मोठे मोठे फोड आले होते व अंगी भयंकर अशक्तपणा आला होता. त्यामुळे प्रवेशिका परिक्षा पास करण्याची संधी मी गमावली. तोंडाशी आलेला घास क्रूर नियतीने हिरावून घेतला. होता. त्याची चुटपुट मला बरेच दिवस अस्वस्थ करीत होती. प्रवेशिका परिक्षा पास झालो

नाही तरी अभ्यासक्रमासाठी म्हणून वाचलेली हिंदीतील प्रख्यात लेखक प्रेमचंद यांच्या 'गबन','निर्मला','गोदान'या कादंबऱ्यांनी मी फार प्रभावित झालो होतो. तसेच 'मेवाड-पतन' या नावाचे वीररसाने ओथंबलेले नाटक पण अभ्यासक्रमात वाचले होते. या पुस्तकाचे लेखक मला आठवत नाहीत. हिंदी साहित्य वाचण्याचा नाद मला जो लागला तो अजून चालू आहे.

४६

कारवार तालुक्यातील चेंडिया या गावातील 'पॉप्युलर न्यू इंग्लिश स्कूल' मध्ये हिंदी व अन्य भाषा शिकविण्यासाठी म्हणून माझी नेमणूक करण्यात आली होती. पूर्वीचे शिक्षक श्री. गणपती पै हे नोकरी सोडून गेल्यामुळे त्यांची जागा रिकामी होती. संस्थेचे अध्यक्ष श्री. रघुपती शेणवी मला कडवाडला येऊन भेटले. त्यांच्या सूचनेनुसार त्या शाळेत ती साधारण ८ महिने नोकरी केली. तिथे संस्कृत, हिंदी व कन्नड हे विषय मी शिकवित होतो. माझ्या शिकविण्याच्या धाटणीमुळे मुले माझ्यावर जाम खूश होती. धाकटी बहीण जान्हवीला चेंडियाला आणून श्री शेषगिरी शेणवी यांच्या घरी बिऱ्हाड थाटले होते. शिक्षण खात्याच्या नियमानुसार School Teacing Course (S. T. C.) पूर्ण केलेल्यांनाच शाळा कायम स्वरूपात नोकरीला घेत होती माझ्याकडे तशी पदवी नसल्यामुळे नवीन शैक्षणिक वर्ष सुरू होताच मला नारळ देण्यात आला. मी बिऱ्हाड गुंडाळून गावी परतलो.

चेंडियेहून परतल्यावर जान्हवीची सोयरीक जुळली कडवाड येथील श्री माधव भट यांच्या लग्नाच्या वऱ्हाडात मी व जान्हवी कडिए या गावी गेलो होतो त्या लग्नाला हळग्याजवळील ओती येथील श्री रामकृष्ण सीताराम भट'हा उपवर मुलगा पण हजर होता. तिथेच त्यांनी जान्हवीला पाहिले होते. त्यांच्या घराण्याशी आमचं पूर्वपार नातं होतं त्यामुळे हा संबंध जुळून येण्यास कोणताही अडथळा निर्माण झाला नाही. काही महिन्यांनी कडवाड`यथील आमच्या घरी लग्न सोहळा थाटात पार पडला त्यांना जीवन, अनंत, शोभा, कृष्णराय व लीना अशी मुले झाली.

जान्हवीचे लग्न लागून घरी स्थिरस्थावर झाल्यावर पुन्हा एकदा माझी नोकरीची शोधाशोध सुरू झाली धारवाड विभागात पोस्टमन नेमणार असल्याची जाहिरात वर्तमानपत्रातून झळकली होती. मी कोणलाही न सांगता अर्ज पाठवून

दिला. धारवाडला जाऊन लेखी व तोंडी परीक्षा पार पाडली व त्यात मी पास झालो. वैद्यकीय दाखला सादर केल्यावर माझी हळियाळ तालुक्यातील सांब्राणी या खेडेगावात नेमणूक झाली. तिथे मी वर्षभर नोकरी केल्यावर एक दिवस मला भयंकर ताप भरला व त्यातूनच पुढे हातापायांची हालचाल करणे अशक्य झाले.कारवार येथील सिव्हिल हॉस्पीटलात सहा महिने उपचार घेतल्यावर माझे दोन्ही हात पूर्ववत काम करू लागले खरे पण पायांत मात्र गुडघ्याखाली नसांचे दौर्बल्य आले.त्यामुळे मला पूर्वीप्रमाणे चालणे,धावणे किंवा साकयल चालवणे अशक्य झाले त्या भयंकर आजारपणामुळे माझी तिसरी नोकरी(पोस्टमनची) सुटली व माझी गाडी पूर्वपदावर बेकारीच्या खाडीत येऊन स्थिरावली.

४ ७

वर्षभराने मी कुबड्या किंवा काठीच्या आधाराशिवाय चालू शकलो खरा पण पायात व्यंग राहिले ते कायमचेच. पुढे काय ? घराण्याची भिक्षुकी वृत्ती मी शिकावी व त्यावर गुजराण करावी असा सर्वांचा आग्रह होऊ लागला. पण मला भिक्षुकी करण्याचा भयंकर तिटकारा होता. त्यामुळे पेचात अडकलो होतो. अडकित्त्यात सापडलेल्या सुपारी सारखी माझी गत झाली होती. रात्र-रात्रभर विचार करुन करून मला झोप येत नव्हती.

मी थोडीबहुत पूजाविधी व अन्य धार्मिक संस्कार करण्याचे शिक्षण घेऊ लागलो. पण त्यात मन रमत नव्हते. दिवसभर मी बेचैन असायचो. रोज सायंकाळी ग्रामपंचायतीच्या बाहेर मोकळ्या वरांड्यावर पत्ते खेळायला काही जण जमत. रमी, तीनशे चार, दाडपिड अशा सारखे खेळ तिथे चालत. मी टाईमपास म्हणून तो खेळ बघायला रोज जायचो. एक दिवस एक भिडू न आल्यामुळे अन्य तिघांनी मला त्यांच्या खेळात सामील करून घेतले. ती बातमी कोणीतरी घरी माझ्या वडिलांच्या कानावर घातली. त्यांना पत्त्यांच्या खेळाबद्दल अतिशय तिटकारा होता. पत्ते खेळणारे पुढे 'जुगारी' बनतात अशी त्यांची ठाम समजूत होती. त्याबाबत ते द्युतात हरलेल्या पांडवांच्या दुर्दशेची कथा ऐकवीत असत. मी पत्ते खेळायला बसलो होतो. तिथे ते बिंबलाच्या झाडाची फांके घेऊन आले. मी रस्त्याच्या बाजूला पाठ करून बसल्यामुळे ते आले ते मी पाहिले नाही. सपासप पाठीवर मार बसल्यानंतरच मला काय झाले ते समजले. अशा प्रकारे पहिल्याच दिवशी पत्ते खेळण्याची माझी हौस फिटली.

## जांबावली ते आंबीवली

## ४८

विठोबा देवळाच्यापुढे असलेल्या ''सदानंद हॉटेलचे' मालक श्री. सदानंद वैकुंठ शेणवी हे आमच्या ओळखीचे होते. त्यांच्या मुलाला मुंबईत नोकरी लागून तो जोगेश्वरी येथे जागा घेऊन राहत होता. आईवडिलांनी गावातील हॉटेलच्या धंदा सोडून मुंबईत आपल्याकडे कायमचेच राहायला यावे असा त्याचा लकडा त्यांच्या मागे लागला होता. सदानंदांना शाळेत जाणारी मुलगी होती. शिक्षण पूर्ण होताच तिचं लग्न करून टाकावे व त्यानंतर मुलांच लग्न करावं असा त्यांचा विचार होता. त्याच वेळी चांगलं चालणार हॉटेल बंद करून मुंबईला निघून जावं की न जावं अशा द्विधा मनस्थितीत ते सापडले होते. शेवटी दोन वर्षासाठी मुंबईला जाऊन रहावं, मुलीचं व मुलाचं लग्न उरकावं व तिथे जमलं नाही तर कडवाडला परत यावं असं त्यांच ठरलं. आमच्या घरी येऊन त्यांनी एक प्रस्ताव आमच्या पुढे मांडला. डेपॉझिट किंवा भाडं न घेता ते दोन वर्षासाठी मला हॉटेल चालवायला देणार होते.हॉटेलचं लायसन्स मात्र त्यांच्या नावावरच राहणार होतं.ते परतल्यावर हॉटेल मी त्यांच्या ताब्यात द्यावं असं ठरलं. काही कारणाने ते परतायच्या अगोदर मला जर हॉटेल सोडायचं असेल तर मी हॉटेलचा ताबा त्यांचे नातेवाईक श्री. बाबली भट यांच्याकडे द्यावा. तो प्रस्ताव मी मान्य केल्यावर त्यांनी पुढील आठवड्याभर हॉटेल धंद्यातील अनेक बारकावे मला समजावून दिले

हॉटेल बऱ्यापैकी चाललं होतं. जीवनात थोडी स्थिरस्थावरता प्राप्त झाली होती. ते बघून घरी माझ्या लग्नाचे बेत चालायला लागले. मी सावध झालो. माझ्या भावंडांचे शिक्षण, नोकऱ्या व लग्न व्हायचे होते. ''किमान आणखी चार वर्षे तरी मी लग्न करणार नाही.'' असे निक्षून सांगितल्यावर लग्न प्रस्तावावर पडदा पडला. हॉटेलच्या धंद्यात जम बसत चालला होता तरी त्यात माझं मन रमत नव्हतं. कारण लहानपणापासून आईने माझ्या मनात एक विचार ठासून भरलेला होता.

लहानपणी आई तिच्या आई बरोबर मुंबईत राहणाऱ्या नागप्प मामाकडे (नागप्पा देसाई) महिनाभर रहायला गेली होती. नागप्पा मामा हे एका ब्रिटिश कंपनीत अकौन्टंट म्हणून काम करत होते. जोगेश्वरी पूर्व बाजूला असलेल्या ''फ्रेंडशिप सोसायटी'' या विशाल कॉलनीत ''शांतीकुंज'' नावाचा नागप्पा मामाचा भव्य असा बंगला होता. त्या सोसायटीतील बहुतांश लोक हे कारवारकडील

होते. तिथले अनेकजण वेगवेगळ्या कार्यालयात मोठमोठ्या हुद्यावर काम करीत असत. त्यांचा थाटमाट बघून आई प्रभावित झाली होती.

जेव्हा माझी मुंज पार पडली तेव्हा मी घराण्याची वैदिक वृत्ती (भिक्षुकी) शिकावी असे वडिलांचे मत होते. आई मात्र हट्टाने सांगायची, ''मी रायाला विंग्लिश शाळेतच घालणार व त्याला नागप्पा मामासारखा ऑफिसर बनवणार.'' त्यामुळे नशीब काढायचं असेल तर मुंबईला गेल्याशिवाय पर्याय नाही असे समीकरण माझ्या डोक्यात फिट्ट बसलेले होते. त्या दृष्टीने काय करता येईल याचा मी सतत विचार करीत असे.

हॉटेलमधील गिऱ्हाईकांना वाचण्यासाठी, म्हणून मी 'सकाळ' (मराठी) व 'संयुक्त कर्नाटक' अशी दोन वर्तमानपत्रे ठेवीत असे. गिऱ्हाईक नसल्यावेळी मी बारकाईने नोकरी विषयक जाहिराती न्याहाळी. त्यावेळी धारवाड, बेळगाव, विजापूर व कारवार हे चार जिल्हे Bombay Province मध्ये होते. त्यांना Bombay Karnatak असे म्हणत. त्यामुळे आमच्याकडील लोकांना मुंबईत नोकऱ्या मिळणे सोपे जात होते. एकदा संयुक्त कर्नाटकांत पश्चिम रेल्वेत नोकरभरती होणार असल्याची जाहिरात झळकली. मी ताबडतोब अर्ज पाठवून दिला व ती गोष्ट विसरून गेलो. साधारण आठ-दहा महिन्यांनी मला मुंबईतील विले पार्ले येथील टिळक विद्यामंदिरात लेखी परिक्षेला हजर राहण्याचे पत्र रेल्वे बोर्डाकडून आले. चांगलं चाललेल हॉटेल सोडून मी मुंबईला जाऊ नये असे घरातील मंडळीचे आग्रही म्हणणं होत. त्यांचा विरोध मोडून काढून मी मुंबईला जाण्याची तयारी सुरू केली. त्याच दरम्यान रत्नाकर मुंबईतील 'असोसिएटेड सिमेंट कंपनी'त इंटरव्ह्यूसाठी जाणार होता. आम्ही दोघांनी एकत्रच प्रवास करायचा असे ठरविले. ती बातमी समजल्यावर श्री. बाबलि भट यांची मुलगी विठाबाई ही आपण पण मुंबईला येते. असा आग्रह धरून बसली. तिची थोरली बहीण लली (ललिता) दादर पोर्तुगीज चर्चजवळील ''चंदन मॅन्शन'' बिल्डिंगमध्ये राहत होती. विठाबाई मुंबईला आल्यास तिला नोकरी लावणे व तिचं लग्न जूळवून देणें सोपे होईल असे लली व तिचे यजमान (केशव नायक) यांचे म्हणणे होते.

मुंबईला जाण्याचा हा आम्हा तिघांचा पहिलाच प्रवास होता. त्यामुळे मनात थोडी धाकधुक होती. कारवार ते हुबळी बसने, हुबळी ते पुणे आगगाडीने व पुण्यात गाडी बदलून मुंबईकडे असा आमचा प्रवास झाला. आम्हाला उतरवून

घेण्यासाठी आमचा वर्गमित्र गोविंद नायक व्ही. टी स्टेशनला आला होता. विठाबाईला तिच्या भाऊजींनी दादरला उतरवून घेतले होते. एवढे मोठे अवाढव्य शहर, इथली धावपळ, गर्दी व धांदल बघून मी मनातून धास्तावून गेलो. इथे आपली डाळ शिजणार की नाही अशी शंका मनाला चाटून गेली.

मी रेल्वे परीक्षा दिली. एसीसी. मधील इंटरव्ह्यू आटोपून रत्नाकर गावी परतला. रेल्वे परीक्षेचा निकाल लागायला बराच अवधी लागणार होता. गावी न परतता मुंबई हेच माझे कार्यक्षेत्र व कर्मभूमी बनवायचीच असा मी पक्का निर्धार केला. त्या काळात 'टाइम्स् ऑफ इंडिया' मध्ये मी 'अ सिटी ऑफ अपॉर्च्यूनिटीज' या नावाचा मुंबईबद्दलचा लेख वाचला होता. मी गोविंदच्या बिऱ्हाडी राहून नोकरी संशोधनाचे काम जोरात सुरू केले.

रोज टाइम्स् ऑफ इंडिया वाचून वेगवेगळ्या ठिकाणी अर्ज पाठवित होतो. मुंबईला कायमचेच राहायचे आहे तर त्या शहराची इत्यंभूत माहिती असलेली बरी म्हणून मी रेल्वेचा तिमाही पास काढला. रोज एका स्थानकात उतरून तिथून चालत रमत-गमत आजूबाजूच्या इमारती व दुकाने लक्षात ठेवून पुढील स्टेशन पर्यंत चालत जात असे. पुढे गाडी पकडून घरी परतत होतो. अशाप्रकारे मी चर्चगेट ते बोरीवली पर्यत (पश्चिम रेल्वे) व व्हिक्टोरिया टर्मिनस पासून ठाणेपर्यंत असा परिसर ओळखीचा करून घेतला.

गोविंदबरोबर आमच्या गावाकडील आणखी चार-पाच जण 'पेयिंग गेस्ट' म्हणून राहात होते रोजचा माझा भटकंतीचा प्रयोग म्हणजे शुद्ध वेडाचार आहे असे त्या सर्वांचे एकमत होते. त्याकडे दुर्लक्ष करून मी माझा कार्यक्रम निष्ठने चालवत होतो. पुढील जीवनात मला त्या भटकंतीचा अतोनात फायदा झाला. मुंबईतील कोणत्याही भागात लवकरात लवकर कसे पोहचावे याचा आराखडा माझ्या मनात सदैव तयार असे. जिथे आगगाडी जात नसे त्या विभागात मी बसमधून उलट-सुलट प्रवास करून व पायी चालून सर्व परिसर न्याहाळून ठेवी.

माझे मावसभाऊ बाबण्णा (व्यंकटेश माधव कामत) हे एक दिवस अकस्मात जोगेश्वरीला येऊन भेटले. ते रिझर्व बँकेत स्टेनोग्राफर म्हणून काम करत होते. ते खार पश्चिम येथील सोळाव्या रस्त्यावर भाड्याच्या घरात राहत होते त्यांच्या आमंत्रणावरून मी 'आनंदाश्रम' या वसाहतीतील त्यांच्या बिऱ्हाडी

राहायला गेलो. त्यांनी टायपिंगचा कोर्स पूर्ण केल्याशिवाय मुंबईत नोकरी मिळणे कठीण आहे असे सांगून मला वांद्रे स्टेशनजवळील 'Bandra Typing and Shorthand Institute' या संस्थेत दाखल केले. तिथे सकाळ व संध्याकाळ असे दोन तासांचे क्लास भरून तीन महिन्यांच्या आतच मिनिटाला चाळीस शब्द या वेगाची सरकरी परिक्षा पास केली व तसे प्रमाणपत्र मिळविले. बाबण्णाची थोरली बहीण (इंदिराक्का) हिच्याकडे जेवायला जात असे.

४९

सदानंद शेणवी यांचे थोरले बंधु पद्मनाभ शेणवी हे दादर पोर्तुगीज चर्चजवळील 'चंदन मेंशन' मध्ये राहात होते. त्यांच्या ओळखीने गोरेगाव येथील 'आरे मिल्क कॉलनी'त हंगामी टायपिस्ट म्हणून मला नोकरी मिळाली. दरमहा पगार फक्त साठ रुपये होता. गोरेगाव रेल्वेस्टेशन पासून ओर मिल्क कॉलनी पर्यंत ये-जा करण्यासाठी स्टाफ बस होती. संस्थेतर्फे ओळखपत्र मिळाल्यानंतर बसमधून ये-जा करण्यासाठी म्हणून मोफत प्रवासाची सोय झाली. ओर मिल्क कॉलनीत मला कायम स्वरूपाची नोकरी मिळण्याची शक्यता नव्हती. कारण तिथली भरती एमप्लॉयमेंट एक्सचेंज मधून केली जात असे. ते समजल्यावर मी ताबडतोब गिरगाव येथील कोंबडी गल्लीत असलेल्या नोकरी विनिमयकेंद्रात माझे नाव नोंदविले.

आरे मिल्क कॉलनी व तिथला परिसर अतिशय सुंदर रितीने निर्माण केला गेला होता. सगळीकडे हिरवीगार शेते, मध्ये मध्ये आखीव रेखीव म्हशींचे तबेले, वाहते पाणी, नानाविध रंगांची फुलझाडे व अनेक तऱ्हेची फळझाडे असे तिथले दृश्य अतिशय मनोहारी दिसायचे. अनेक वेळा सिनेमाचे चित्रीकरण तिथे पार पडे. शुटिंग बघायला आम्ही जेवणाच्या सुट्टीत किंवा सायंकाळी जात असू. आता तिथे अद्यावत अशी Film City उभारण्यात आली आहे. आरे-मिल्क कॉलनीच्या एका टोकाला जलतरण तलावासहित सुंदर असा Picnic Spot उभारण्यात आलेला होता. बोरिवली येथील संजय गांधी राष्ट्रीय उद्यान विकसित होईपर्यंत मुंबई नगर येथील लोकांचा Picnic Spot म्हणजे आरे मिल्क कॉलनी हीच होती.

खारहून गोरेगावापर्यंत रेल्वेने जाणे व पुढे बसने जाणे-येणे यात माझा बराचसा वेळ आणि श्रम वाया जात होते. शिवाय तिथली नोकरीपण कायम

स्वरूपाची नव्हती. त्यामुळे मुंबईजवळ कुठेतरी नोकरी मिळविण्याची माझी खटपट चालू होती. इंदिराक्काच्या घराशेजारी श्री. नायक यांचे बिऱ्हाड होते फाळणीनंतर श्री. नायक कराची येथील आपली हबीब बँकेतील मॅनेजरची नोकरी सोडून मुंबईत स्थायिक झाले होते. क्रॉफर्ड मार्केट जवळ ''नायक ट्रेडिंग कंपनी''नावाची वेगवेगळ्या आकारांचे Valves विकण्याची त्यांची कंपनी होती. त्यांना चांगल्या टायपिस्टची गरज होती. इंदिराक्काच्या मदतीने मला श्रीनायक यांच्या कार्यालयात नोकरी मिळाली. तिथे दर महिना शंभर रुपये पगार मिळत होता. श्री. नायक यांच्या कार्यालयात असेपर्यंत मी दुपारचे जेवण क्रॉफर्ड मार्केट जवळील 'सदानंद हॉटेल' येथे करत होतो. जेवायला गेल्यावेळी रिकामा वेळ असेल तेव्हा क्रॉफर्ड मार्केटजवळ विकायला ठेवलेले अनेक पशु-पक्षी बघण्यात मी माझा वेळ घालवत होतो. आरे मिल्क कॉलनीत नोकरीला असेपर्यंत मी अनेकवेळा श्री. पद्मनाभ शेणवी यांच्या घरी जात असे. त्याच बिल्डिंगमध्ये श्री. केशव नाईक, पत्नी लली (ललिता) आपल्या तीन मुलांसोबत राहत होते. माझ्या सोबत मुंबईला आलेली विठाबाई अंधेरी येथील एका फॅक्टरीत कामाला लागली होती.

५०

दरम्यान माझा धाकटा भाऊ रामानंद एस.एस. एल्. सी. पास होऊन गावी बेकार बसला होता. मी त्याला मुंबईला आणून Associated Cement Companies (A.C.C.) यांच्या कैमूर (M.P.) येथील त्यांच्या ट्रेनिंग विद्यालयात पाठवून दिले. रामनंदाच्या पाठोपाठ माझा पुतण्या प्रेमानंद, बालमित्र विठू (विठ्ठल व्यंकटेश भट) त्यांच्या पाठोपाठ रामानंद -प्रेमानंद यांचा वर्गमित्र कृष्णा पडती हे पण मुंबईला येऊन दाखल झाले. बाबण्णाचे लग्न झाल्यामुळे व त्यांच्याकडील जागेच्या अडचणींमुळे मी खारपूर्व येथील जवाहर नगर या विभागात गुरूबक्षासिंग पंजाबी चाळ येथे एक १०' × १०' अशी खोली भाड्याने घेतली. आजूबाजूला पत्रे व वरती मंगळूरी कौले अशा प्रकारची ती झोपडपट्टी होती. पाणी व संडासची व्यवस्था सार्वजनिक स्वरूपाची होती. रुपये ५०० डॅपोजिट व महिना १५ रु. भाडे या तत्वावर मला ती खोली मिळाली होती. त्या खोलीत मी, विठू, कृष्णा व गोविंद अशी मंडळी राहत होतो. रात्रीचे जेवण सर्वजण मिळून करायचो. सकाळी चहा-पाणी आटपून आम्ही सर्वजण आपापल्या उद्योगाला जात असू रजेच्या दिवशी आमचा पत्त्यांचा डाव रंगत असे. त्यात नाडकर्णी व हेगडे असे दोन मित्र

खेळायला म्हणून येत असत.

नायक ट्रेडिंग कंपनीतून निघून मी रिझर्व बँक मागील 'हरून मॅनशन' येथे असलेल्या Kinematograph Renters Association संस्थेत टायपिस्ट म्हणून दाखल झालो. तिथे दरमहा रु.१०० पगार मिळत असे. त्यानंतर मी लॅमिंगटन रोड येथील 'नाझ' सिनेमा जवळ असलेल्या 'मलबार मोटर्स' या कंपनीत दरमहा रुपये १३० पगारावर नोकरी धरली. तिथे असताना मी 'लॅमिगंटन ऑटोमोबाईल्स' या कंपनीत सायंकाळी एकतास अर्धवेळ नोकरी धरली. रामानंदाला दरमहा ठराविक रक्कम पाठवावी लागे. तसेच घरी आईवडिलांनापण नियमितपणे पैसे पाठवित असे. शिवाय सकाळी लवकर उठून गिरगावात दोन ठिकाणी शिकवण्या घेत असे. मलबार मोटर्स येथे काम करीत असताना Employment Exchange तर्फे National Small Industries Corporation (N.S.I.C.) या निमसरकारी संस्थेत लोअर डिव्हिजन क्लार्क म्हणून नोकरी लागली. इथे मला रु. १५० पगार मिळत होता.

बाबण्णाच्या घरी राहत असताना त्यांच्या शेजारी मेहेंदळे कुटुंब राहत होते. मेहेंदळे पती–पत्नी नोकरी करीत असत. आपल्या लहानग्या मुलीला पाळणाघरात ठेवून कामाला जात. रजेच्या दिवशी किंवा मी मोकळा असेन तेव्हा त्यांची मुलगी माझ्याशी खेळायला येई. ती 'दगड' या शब्दाऐवती 'बगड' असे म्हणायची. बारीक बारीक दगड गोळा करून ती आणायची आणि आम्ही खेळत असू. मी तिला 'बगड' म्हणूनच हाक मारीत असे. तिलाही ते नाव फार आवडायचे. तिथलं वास्तव्य संपल्यावर माझा मेहेंदळे कुटुंबाशी असलेला संपर्क सुटला. बऱ्याच वर्षांनी त्या वसाहतीत गेल्यावर श्री. मेहेंदळे यांचे रस्ता अपघातात निधन झाल्याची दुःखद बातमी समजली.

खार पश्चिम येथील सोळाव्या रस्त्याच्या कोपऱ्यावर असलेल्या साधना सोसायटीत मूळ यल्लापूरचे श्री. देवनळ्ळी राहत होते. त्यांची पत्नी जया ही माझ्या आईची मामेबहीण (श्री. नागप्पा देसाई यांची मुलगी) देवनळ्ळी यांचे घर व प्रसिद्ध नृत्यकार –''झनक झनक पायल बाजे'' फेम श्री. गोपीकृष्ण यांचा 'नटराज' बंगला शेजारी शेजारी होते. दोन्ही घरातील माणसे खिडकीतून एकमेकांशी गप्पागोष्टी करीत असत. देवनळ्ळीची दोन्ही मुली गोपीकृष्ण यांच्याकडे शास्त्रीय नृत्य (भरतनाट्यम) शिकायला जात असत. गोपीकृष्ण यांना मूलबाळ झालं



लेखकांचे
आई-वडील-
सौ.पद्मावतीबाई
(तारा) व
श्री.देवीदास
विठ्ठल भट
(बाबन)



कडवाड येथील
वडीलोपार्जित घर.
उजवीकडील
खोलीत लेखक व
भावंडांचा जन्म



नेहरु घराण्याचे
" आनंद भवन"
(अलाहाबाद) येथील
प्रांगणात
लेखक पत्नीसह




एकषष्ठी
समारंभात
मोरया प्रकाशनाचे
श्री.दिलीप महाजन
लेखकाचा
सन्मान
करताना

लेखकाच्या मुंजीची आमंत्रण पत्रिका





पॉप्युलर न्यु इंग्लिश स्कुल, चेंडिचे. बसलेले डावीकडून दुसरे लेखक

बालमित्र लेझिम पथकाच्या सभासदांसह लेखक





प्रार्थमिक शाळेच्या जीर्णोध्दारासाठी उपोषणास बसलेले पुरोगामी युवक मंडळाचे सभासद डावीकडून बसलेल्यात दुसरे लेखक

नव्हतं. त्यावरून शाळकरी मुले त्यांच्या बंगल्यावरून जाताना त्यांना 'ए छक्का, ए छक्का' असे चिडवत असत.

५१

बेंगळूर येथे बाबण्णाचे लग्न पार पडले. नवरी अंकोल्यातील केरेकट्टे जवळील गंगामावशीचा दीर श्री दत्तात्रय (आप्पा) नाडकर्णी यांची तिसरी मुलगी सुमन. मी नुकताच नोकरीला लागल्यामुळे लग्नाला जाऊ शकलो नाही. वर्षभरात त्यांना दीपक (माधव) हा मुलगा झाला. बाळंतपणातून वहिनी खारला परतताच आम्ही राहत असलेल्या जागेचे मालक डॉ.बी.बी.पंड्या यांचे लग्न ठरल्यामुळे त्यांनी जागा खाली करायला सांगितली.त्यामुळे आम्ही वांद्रे स्टेशनजवळील 'भागीरथी सदन' या इमारतीत राहणारे श्री.बाळकृष्ण मुजुमदार यांच्या जागेत रहायला गेलो. मुजुमदार यांच्याकडे स्वतंत्र दार असलेली एक अतिरिक्त लहान खोली होती.संडास, बाथरूम व पाण्याचा नळ एकां बाजूला होते. जागेच्या अडचणीमुळे मी खोलीबाहेर वरांड्यात पथारी टाकून झोपत असे. पावसाळा सुरू झाल्यावर अंगावर पाणी पडून वरांड्यात झोपणे मुश्कील झाले. खारपूर्व येथील जवाहरनगर या झोपडपट्टीत एक खोली मिळाली. सुंकेरी येथील माझे बालमित्र श्री.नरसिंह सुब्राय शेणवी यांची व आमच्या चाळीचे मालक श्री.गुरूबक्षसिंग यांची ओळख होती. झोपडी का असेना, डोक्यावर छप्पर तर मिळाले! खोलीचा ताबा घेताच मी मालकाच्या परवानगीने माझ्या खर्चाने बाहेरील वरांडा बंद करून घेतला.त्यामुळे आणखी एक खोली वापरायला मिळाली.

प्रेमानंद, जुहू येथे राहणारी त्याची मावशी आमण्याका हिच्याकडे रहायला गेला सांताक्रूझ येथील वाकोला ब्रिजजवळील झोपडपट्टीत स्वतःची खोली घेईपर्यत प्रेमानंद जुहूलाच राहिला होता.तो तिथे असे पर्यत मी अनेक वेळा अमण्याकाच्या घरी राहिलेलो आहे.

५२

जास्त पगार मिळतो म्हणून (दरमहा रु १८०) मी (नॅशनल स्मॉल इंडस्ट्रीज कॉर्पोरेशन' येथील नोकरी सोडून'लाईफ इन्शूरन्स कार्पोरेशन ऑफ इंडिया' संस्थेत टायपिस्ट म्हणून नोकरीला लागलो मी तिथे असताना मूळ अवर्सा या गावातील श्री एम डी भट या डेव्हलपमेंट ऑफिसरची ओळख झाली त्यांनी मला त्यांच्या अधिपत्या खाली LIC एजन्ट म्हणून काम करण्याची

गळ घातली. त्यावेळपर्यंत जवाहर नगर येथील अनेक चाळींमधून मी भाडेकरूंना संघटित करून मोठी संघटना उभी केली होती. त्यामुळे विमा एजन्ट म्हणून लोकांना पॉलीसी विकण्यात मला काही अडचण आली नाही. मी सतत दहा वर्षे विमा एजन्ट म्हणून काम करून ते काम सोडून दिले. या व्यवहारातून मला कमिशनच्या रूपाने दरमहा बरीच रक्कम मिळत असे.

रविवारच्या दिवशी पत्ते कुटण्याच्या आमच्या कार्यक्रमात सेन्ट्रल बँकेत काम करणारे श्री. के.जी.के.हेगडे हे नियमितपणे सहभागी होत असत. ते मंगळूर जवळील गावात राहणारे होते. त्यांना उत्तर कर्नाटकातील (आमच्या भागातील) मुलीशी लग्न करायची इच्छा होती.त्यामुळे मी माझ्या बहिणीचे यजमान श्री. रामकृष्ण भट यांना कळविले. त्यांच्या ओळखीने हळगे येथील कु. सुलोचना पैं हिच्याशी श्री. हेगडे यांचा विवाह पार पडला. लग्न झाल्यावर हेगडे यांनी प्रेमानंद राहत असलेल्यां 'प्रतीक्षा नगरातील झोपडपट्टीत आपले बिऱ्हाड थाटले. त्यावेळेला विमा एजन्ट म्हणून काम करायचे मी बंद केले होते, ती गोष्ट हेगडे यांना माहीत होती. त्यांच्या विनंतीवरून मी हेगडेंशी श्री. एम. डी. भट यांची ओळख करून दिली. पुढे अनेक वर्षांपर्यंत श्री.हेगडे यांनी विमा एजंट म्हणून यशस्वीपणे काम चालविले. काही काळानंतर हेगडे यांना कल्पना नावाची मुलगी झाली. नंतर त्यांनी दहीसर पूर्व येथे ब्लॉक घेऊन ते तिथे राहायला गेले. प्रेमानंदाने कलिना येथील 'माया' या हाऊसिंग सोसायटीत जागा घेतली. प्रेमानंदाचे कुम्ठा गावातील कुमारी वैजारी कामत यांच्याशी विवाह पार पडला. त्यांना मनोज व संगीता अशी दोन मुले झाली.

५३

जीवन विमा निगममधून राजीनामा देऊन मी कालबादेवी येथील 'डि. व्ही. इंडस्टीज' या कंपनीत टाईपिस्ट-कम-ऑफिसर या पदावर दरमहा रु.२७५ पगारावर रूजू झालो. तिथे मला स्वतंत्रपणे काम करण्याची व ड्राफ्ट करून पत्रे टाईप करण्याचे संधी मिळाली. मी नव्या पदावर रूजू होताच एक दिवस अचानक माझ्या आईची मावशी (केरेकट्टा गंगा मावशी) हिचं लांबलचक असं पत्र आलं.

गंगामावशीच्या विस्तृत पत्राचा थोडक्यात गोषवारा असा होता – ''माझे भाचे व तुझ मामा श्री. काशीनाथ भट यांची थोरली मुलगी कु. कल्याणी (प्रेमा) ही विवाहयोग्य झाली असून तिचं तुझ्याशी लग्न व्हावं अशी त्यांची व

तुझ्या आईची इच्छा आहे. मामे-भाचे या नात्याची सोयरीक असल्यामुळे जातक वगैरे पाहण्याची गरज नाही. मी कडवाडला जाऊन तुझ्या आई-वडिलांना भेटून आले आहे. त्यांची पण या लग्नाला संमती आहे तुझ्या वडिलांची तब्बेत अतिशय गंभीर आहे. काशीनाथ यांची अर्थिक स्थिती चांगली नाही याची तुला कल्पना आहे. तरीपण सर्व वडीलधाऱ्यांचे आशीर्वाद तुला लाभतील. या बाबत तुझा विचार काय आहे हे उलट टपाली ताबउतोब कळवावे.''

आणखी दोन वर्षे तरी माझा लग्न करण्याचा विचार नव्हता. होईल तेवढी मुंबई येथील नोकरी करणाऱ्या मुलीशी लग्न करावं असा माझा विचार होता. दरम्यान वडील सीरीयस असल्याची तार आली. तेव्हा लगबगीने मी गावी गेलो. मुंबईला येऊन साडेतीन वर्षे झाली होती. मलापण गावाकडची ओढ लागली होती. वडील खरोखरच मरणासन्न स्थितीत होते. ''माझ्या डोळ्यापुढे तुझे लग्न पार पडावे अशी माझी शेवटची इच्छा आहे.'' असे त्यांनी डोळ्यात अश्रू आणून सांगितले त्यामुळे मी मामाच्या मुलीशी लग्न नक्की करून मुंबईला परतलो.

लग्न होईपर्यंत साधारण साडेतीन वर्षाच्या काळात रात्रीचे जेवण मी व माझे खोलीतील सहकारी मिळून बनवीत. त्यासाठी लागणारी पोतीभर भांडी कडवाडहून येताना आणली होती. त्यातील बहुतांश भांडी पितळ व तांब्याची होती. त्यामुळे त्यांना वारंवार कल्हई लावून घ्यावी लागे. पुढे थोडी आर्थिक सुबत्ता आल्यावर मी तांब्यापितळींची भांडी विकून स्टीलची भांडी घेतली. त्याच वेळेला प्लॉस्टिकयुग सुरू झाले होते. त्यामुळे घरात हळूहळू प्लॉस्टिकच्या भांड्याची भर पडत चालली.

५४

पूर्वीच्या काळी मुलींची लग्ने अगदी लहान वयातच उरकून घ्यायचे. ''अष्ट वर्षात् भवेत् कन्या'' म्हणजे आठवे वर्ष लागले की बालिकेचे कन्यारूपात परिवर्तन होऊन ती विवाहास योग्य झाली असे समजत. सर्वसाधारणपणे मुलींची लग्ने त्यांच्या ८ ते १२ वर्षाच्या कालावधीतच पार पडायचे. त्यामुळे अनेक गमती-जमती व्हायच्या. आठ वर्षाची मुलगी नऊवारी लुगडे नेसून बोंगा सावरत वधू म्हणून मंडपात यायची तर तिचा नवरा २० ते २५ वर्षाचा बाप्या असायचा. लग्न पार पडल्यावर सासरच्या घरी चार दिवस राहिले की मुलीला माहेरी नेत

असत. तिला 'नहाण' आल्यावर जावई व अन्य मंडळींना सन्मानाने घरी बोलावून 'फलशोभन' विधी पार पाडला जायचा. त्यानंतरच खऱ्या अर्थाने वधूची सासरी खानगी केली जायची.

बऱ्याच घरात १३, १४ वर्षांच्या मुली आई झालेल्या असायच्या. त्यामुळे त्यांच्या मुलीच्या लग्नाच्या वेळी आई आपल्या पस्तीशीत ऐन तारुण्यात असायची. त्यामुळे अनेक घरात मुलगी पहिलटकरीण म्हणून बाळंतपणासाठी आल्यावेळी तिची आईपण बाळंत झालेली असायची. गावातील लोकांना हसण्यासाठी हा एक हमखास विषय मिळायचा. याचे एक उदाहरण म्हणजे प्रेमनंदाचा एक मामा सुदानंद (श्रीकंठ) हा त्याच्यापेक्षा लहान आहे. त्याचा मोठा मामा मोहन (पांडुरंग) हा माझ्या वयाचा होता. उन्हाळ्याच्या सुट्टीत तो अनेकवेळा गुंडबाळ्याहून कडवाडला रहायला यायचा. मी मुंबईला आल्यावेळी तो जुहू येथील आपली बहिण (आमण्याका) हिच्याकडे राहत असे. मी त्यांच्याकडे राहत असताना अकस्मात फुफ्फुसाचा आजार होऊन मोहन निधन पावला.

प्रेमानंदचा आणखी एक मामा गिरीधर 'दामोदर' बी. एस्. सी. टेक् होऊन मुंबईत एका मिलमध्ये चांगल्या पगारावर रूजू झाला. आफ्रिकेतील केनीया देशात चांगली ऑफर आल्यामुळे तो परदेशी निघून गेला. त्याकाळी परदेशगमन ही एक कौतुकाची गोष्ट होती. त्याच्याबाबतची बातमी मी फोटोसहित अनेक वर्तमानपत्रांतून छापून आणली.

५५

लग्न होऊन मी खार येथे गृहस्थाश्रमी होईपर्यंत दुपारचे जेवण हॉटेलमध्ये घ्यायचो. आरेमिल्क कॉलनीत काम करीत असताना बाबण्णाची बायको (वहिनी) मला डबा द्यायची. एल. आय. सी. त लागल्यावर फिरोजशहा मेहता रोड वरील 'गोपालाश्रम' या हॉटेलमध्ये जेवत असे. अगोदर पैसे भरून महिन्याभराचा पास घेतल्यास काही रकमेची सूट मिळायची. तिथले जेवण खास कारवारी पद्धतीचे असायचे. नारळाचा भरपूर मसाला घालून भाज्या आमट्या केलेल्या असायच्या. गरमागरम चपात्या गोपालाश्रम येथील खासियत होती. लहान वाटीभर कढत तूप दिले जायचे. त्यात बुडवून चपात्या खाणे हा एक वेगळाच आनंद होता. मल्या नावाचे उडिपीकडील गृहस्थ ती खाणावळ चालवायचे. ते वयस्कर, प्रेमळ असे सद्गृहस्थ होते. सर्व गिऱ्हाईकांशी ते वैयक्तिक संबंध जुळवून ठेवीत

असत त्यामुळे तोंडी जाहिरात होऊन अनेक नवनवीन सभासद (गिऱ्हाईक) त्याना मिळायचे तिथे जेवण चांगले व रूचकर असे मिळत होते. तेथे थाटमाट मात्र नव्हता

काही दिवसांनी जवळच 'हितनिकेतन' नावाचे झकपक असे शाकाहारी हॉटेल निघाले हितकेतनमध्ये मुंबईत नवीन आलेले लोक गिऱ्हाईक म्हणून जायला लागले तरीही आमच्या सारखे 'निष्ठावंत गोपालाश्रमवाले' हितकेतनमध्ये गेलो नाही पुढे चर्चगेट येथील 'इंडो–अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स' मध्ये नोकरी (२६ वर्षे) तेव्हा मी चर्चगेट ते कुलाबा व मरिन लाईन्स ते धोबीतलाव पासून थेट चर्नीरोड येथील हॉटेल्समधून दुपारचे जेवण घेत असे. काही हॉटेलमध्ये ठरविक दिवशी विशेष असे पदार्थ असायचे ते ध्यानी ठेवून सोमवार ते शुक्रवार या दरम्यान मी वेगवेगळ्या हॉटेलमध्ये लचंसाठी जात होतो.

चर्चगेटजवळील 'सत्कार'; 'भारत कॅफे' ; 'युनिव्हर्सिटी कॅन्टिन ' (सध्याच्या वानखेडे स्टेडियम समोर), 'टी सेंटर', पुरोहित हॉटेल', 'गे लॉर्ड', 'मथुराभवन', 'नैवेद्यम्', 'टॉक ऑफ दी टाऊन', 'स्टेडियम रेस्टोरेंट', 'एसीयाटिक रेस्टोरेट' अशा हॉटेल्समधून मी दुपारचे भोजन घेतलेले आहे

फ्लोरा फाऊटन येथील 'वेलकम हॉटेल', 'पर्क हॉटेल', 'पारसीयाना', 'ताबे यांचे आरोग्यमंदिर', 'प्रताप लंच होम', 'मद्रास कॅफे','दिनेश लन्च हॉल', 'लाईट ऑफ एशिया रेस्टोरेंट', 'केळकर विश्रांती भवन', 'कॅफे कॅपीटल', 'पचमपुरीवाला', 'उत्कर्ष', इत्यादी हॉटेल्समध्ये पण माझ जाणं–येण असायचं मेट्रा सिनमाच्या आसपास अनेक मांसाहारी भाजनाची उत्तम हॉटेल्स आहेत लिबटी सिनेमासमोर (बॉम्बे हॉस्पीटल जवळ) लिबर्टी हॉटेल नावाचे उत्तम शाकाहारी हॉटेल आहे 'चेंबर'चे अनेक कार्यक्रम इनकमटॅक्स कार्यालयाच्या मागील बाजूस असलेल्या 'अमेरिकन लायब्ररि'त पार, पडायचे त्यावेळी जवळच असलले 'सन्मान हॉटेल' व त्याच्या परिसरात असलेले 'सह्याद्री हॉटेल' येथेसुद्धा माझं जाण–येणं असायचं त्यामुळं चेंबरमधील माझ्या सहकाऱ्यांचे कोणी मित्र वा नातेवाईक मुंबईला आल्यास त्यांना कोणत्या हॉटेलमध्ये घेऊन जायचे याचा सल्ला माझ्याकडून घेतला जायचा साधारण ३० वर्षे मी दुपारचे भोजन वेगवेगळ्या हॉटेल्समधून घेतलेले आहे त्यामुळं बहुताश हॉटेलमधील मॅनेजर व वेटर्स माझ्या ओळखीचे झालेले होते मी त्यांचा 'परमनंट मेंबर' असल्याने अनेकवेळा

त्यांच्याकडे काही खास 'मेनू' असेल तर मला सुचविला जाई-सोबत इतर लोकांना घेऊन गेल्यास एक डिश फ्री दिली जायची. त्यामुळे मला रूचकर व स्वादिष्ट जेवणाची सवय लागली.

५६

मी 'डि. व्हि. इंडस्ट्री'त कामाला लागल्या पासून फक्त रविवारीच रजा मिळे. या अगोदरच्या सर्व कार्यालयांमध्ये शनिवार अर्ध्या दिवसाचा असायचा. त्यामुळे दर शनिवारी सायंकाळी काम आटपून मी इंग्रजी चित्रपट बघायला जायचो. चर्चगेटसमोरील 'ईरॉस' कुलाब्यातील 'रिंगल', व्हि टी. जवळील 'एक्सेलशियर', 'स्टर्लिंग' 'कॅपीटल' व 'मेट्रे सिनेमा' या सिनेगृहांतून मी अनेक उत्तमोत्तम इंग्रजी चित्रपट पाहिलेले आहेत. रविवारी सायंकाळी हिंदी किंवा मराठी चित्रपट बघायला जात होतो. गिरगावातील 'नाझ','कृष्णा', 'मिनर्वा','ऑपेरा हौस','नोवेल्टी' इत्यादी सिनेगृहांतून अनेक उत्तम हिंदी चित्रपटं पाहिलेले आहेत. मराठी चित्रपट गिरगावातील 'मॅजेस्टिक' दादर येथील 'प्लाझा' व 'कोहिनूर' वांद्र्यातील 'बांद्रा टॉकिज', 'गेटी' व 'गेलेक्सी' अशा अनेक चित्रपटगृहातून मी चित्रपट पाहिलेले आहेत. मुली जरा मोठ्या झाल्यावर मी अनेक चित्रपटागृहात त्यांच्यासह सिनेमे बघण्यासाठी गेलेलो आहे.

गुरुबक्षसिंग पंजाबी चाळीत राहायला आल्यावेळी साधारण ३० ते ४० एवढ्याच खोल्या होत्या. 'पंजाबी चाळ' ही खार रेल्वे स्टेशनपासून अगदी जवळ असल्यामुळे चाळीतील खोल्यांसाठी भरमसाठ अशी मागणी यायला लागली. ''मागणी तसा पुरवठा'' या न्यायाने मालकाने झटपट नवीन खोल्या उभारायला सुरूवात केली. नवे येणारे भाडेकरू बहुतांश कोकणातील होते व ते विविध मिलमधूनं नोकऱ्या करायचे. खोल्यांची संख्या शंभराच्या वर पोहोचली तेव्हा कंपाऊंड मध्ये असेलेला एकमेव संडास व दोन नळ भाडेकरूंच्यासाठी अपुरे पडायला लागले. मालक सरदार गुरूबक्षसिंग यांच्या मालकीचे 'झटका मटण शॉप' होते. त्यामुळे त्यांनी मटण शॉपजवळ तीन पाण्याचे नळ ठेवलेले होते. पण मालक आपले नातेवाईक असलेल्या पंजाबी कुटुंबांच्यांशिवाय अन्य भाडेकरूंना त्या नळांवर पाणी भरायला देत नसत. एक संडास मालकाने खास आपल्या कुटुंबासाठी कुलूप लावून ठेवलेला होता. ''किमान आणखी एक संडास बांधून द्या व दोन नळांची सोय करून द्या.'' असे सांगण्यासाठी म्हणून आम्ही

चारपाच जण मिळून मालकाला सांगायला गेलो. त्यांनी आमचं म्हणण साफ धुडकावून लावलं. ''दरमहा १५ रुपयांच्या भाड्यात मी तुम्हाला याच्यापेक्षा जास्त सवलती देऊ शकणार नाही. अधिक सवलती हव्या असल्यास दरमहा २५ रुपये भाडे द्यायची तयारी ठेवा.'' एवढं सांगून मालक तोंडातल्या तोंडात शिव्या घालत आपल्या खोलीत निघून गेले.

आम्ही सर्वजण परतलो व माझ्या खोली पुढील चिंचोळ्या जागेत मिटिंग घेतली. ''एकमेका सहाय्य करू; अवघे धरू सुपंथ'' या उक्तीप्रमाणे संघटित होऊन चाळ कमिटी स्थापन करावी असा प्रस्ताव मी मांडला. त्यावेळी पंजाबी भाडेकरू सोडून सर्व मराठी भाषिक भाडेकरू (साधारण ६० जण) तेथे जमा झाले व चाळ कमिटी स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आला. त्या कामात मी पुढाकार घ्यावा असे ठरवून सर्वांनी माझी सेक्रेटरी म्हणून निवड केली व पुढील कार्यक्रम ठरविण्याचे सर्वाधिकार मला देण्यात आले.

लहानपणापासून मला वर्तमानपत्रे व मासिके वाचण्याचा नाद होता त्यामुळे माझे सामान्यज्ञान चांगले होते. संघटना कशा बांधल्या जातात व त्या कशा चालवल्या जातात याच्या मी मानसिक नोंदी ठेवल्या होत्या. त्यामुळे चाळ कमिटी स्थापन करण्यासाठी लागणाऱ्या गरजांची पूर्तता कशी करावी याचा मी अभ्यास केला.चांगला मुहूर्त बघून चाळ कमिटीची स्थापना करण्याचे ठरविले. सर्वसाधारण सभा घ्यायची म्हणजे साधारण ६० जण बसण्याएवढी जागा जवळपास नव्हती म्हणून आम्ही विभागात असलेल्या साईबाबा मंदिरात सभा घेण्याचे ठरविले. साईबाबा मंदीर म्हणजे एका सुशिक्षीत दक्षिण भारतीय माणसाचा आश्रम होता.त्यांच्या कार्यालयात डॉ. एस् राधाकृष्णन्, कृष्ण मेनन, जे कृष्णमूर्ती, श्री अरविंद, रमणमहर्षी इत्यादीचे मोठे मोठे फोटो टांगलेले होते.

आमची सभा चालू झाल्यावर मालकांचा जगीरासिंग नावाचा बेवडा असलेला बगलबच्या लांब उभा राहून सभेत काय चाललेले आहे यावर लक्ष ठेवून होता. श्री. रघुनाथ कुडाळकर हे अध्यक्ष; श्री भगवान सावंत (मास्तर) हे उपाध्याक्ष, श्री नमादेव धुरी हे सह चिटणीस, श्री. द्वारकानाथ आरोलकर हे कोषाध्यक्ष हे एकमताने निवडले गेले. मी सरचिटणीस म्हणून या अगोदरच निवडला गेलो होतो. पुढे आमची चाळ कमिटी वीस वर्षापर्यंत चालली पण पदाधिकारी म्हणून पहिल्या सभेत निवडली गेलेली माणसेच पदाधिकारी म्हणून

आलटून पालटून राहत असत. आडव्या उभ्या नऊ चाळी होत्या. त्यामुळे प्रत्येक चाळीमागे एक प्रतिनिधी निवडून कार्यकारिणी तयार करण्यात आली. संघटनेची अशा प्रकारची रचना करताना मी आयुर्विमा कार्यालयात कामगार प्रतिनीधी म्हणून केलेल्या कामाचा उपयोग झाला.

पूर्वीचा अनुभव वाईट आलेला असून सुद्धा आम्ही पदाधिकारी व कार्यकारिणीचे सभासद मालकांना भेटायला गेलो. मालक गुरूबक्षसिंग गांजा मळत बसलेले होते. आम्ही समुहाने आलेले पाहून त्यांनी घाणेरड्या शिव्यांची लाखोली वाहायला सुरूवात केली. त्याकडे दुर्लक्ष करून आम्ही मालकाला ''पंधरा दिवसांच्या आत किमान आणखी एक संडास बांधावा व प्रत्येक चाळीशेजारी एक नळ द्यावा लागेल असे सांगितले.'' ''ऐसा नही किया तो तुम क्या करोगे?'' मालक गरजले. ''आमच्या किमान मागण्या मान्य न झाल्यास आम्ही भाडं देणे बंद करू.'' असा निर्वाणीचा इशारा दिला.'' तुमची संघटना रजिस्टर नाही. त्यामुळे तुम्हाला कोणताही कायदेशीर दर्जा नाही. तुमच्या मागण्या मी मान्य करीत नाही. भाडं देणे बंद केल्यास त्याचे परिणाम फार वाईट होतील.'' असा धमकीवजा इशारा देवून आम्हाला मालकाने परत पाठविले.

पुढे काय करावं याचा विचार करण्यासाठी म्हणून माझ्या खोलीवर तात्काळ कार्यकारिणीची सभा घेण्यात आली.''नवशक्ती''या दैनिकातून ॲडव्हॉकेट महाबळेश्वर मोरजे यांचे भाडेकरूंच्या प्रश्नावंर येणारे सदर आम्ही बऱ्याच जणांनी वाचलेलं होत. ॲड. मोरजे यांचा पत्ता मी नवशक्तीच्या कार्यालयातून मिळविला.ते खार पश्चिम येथील मुनिसिपल वसाहतीत त्यांच्या भाऊंच्याकडे राहत असलेले समजले. त्यांना भेटून कायदेशीर सल्ला घ्यावा असे ठरले. कमिटीच्या खर्चासाठी महिना १० रु.वर्गणी जमा करावी असे ठरले. पराडकर नावाचे एक भाडेकरू मोरजे वकील यांच्या ओळखीचे होते.त्यामुळे पराडकर यांना मोरजे वकील यांच्या घरी पाठवून पुढच्या रविवारची भेटीची वेळ मागितली. त्याप्रमाणे आम्ही त्यांना भेटून भाडेकरू व मालक यांच्यात आजपर्यंत झालेल्या वाटाघाटींची माहिती दिली.''अगोदर तुमच्या तर्फे मी मालकाला नोटीस पाठवतो. त्या नोटीसीला जर जबाब दिला नाही तर भाडं बंद करून मालकाविरूद्ध 'Standard Rent'ची केस दाखल करू.''असे सांगितले.आमच्या वकिलांच्यातर्फे नोटीस मिळताच मालकाने मोठा तमाशा केला.माझ्या खोलीच्या दारासमोर उभा राहून,''इसका

नतीजा अच्छा नही होगा.'' अशी दमदाटी करून मालक निघून गेला.

एक दिवस सायंकाळी मी जरा उशिरा घरी परतत होतो. चाळीच्या प्रांगणात काळोखात दबा धरून बसलेल्या जगीरासिंग हाती चाकू घेऊन अंगावर धावून आला. प्रसंगावधान राखून ती हातातील ब्रिफकेस वर करून तो वार झेलला व मोठ्याने बोंब ठोकली. माझी ओरड ऐकून आजूबाजूच्या खोल्यांतून भाडेकरू बाहेर आले तेव्हा पळून जाण्याच्या तयारीत असलेल्या जगीरासिंगने माझ्या डाव्या हातावर ओझरता असा वार केला त्याचे वळ अजूनही माझ्या डाव्या हातावर आहेत. आम्ही ताबडतोब खेरवाडी पोलीस स्टेशनवर जाऊन रीतसर जगीरासिंग याच्याविरूद्ध तक्रार नोंदविली. त्यावेळी. ड्युटीवर असलेले इन्स्पेक्टर मूर्ती हे कन्नड भाषिके होते. त्यांना कन्नडमधून मी सर्व हकीकत 'समजावून' सांगितली.

इन्स्पेक्टर मूर्ती यांनी जगीरासिंग याला 'मारहाण व खुनाची धमकी' या आरोपाखाली अटक केली. चौदा दिवसांच्या नंतर जगीरासिंग जामिनावर मुक्त झाल्यावर पंजाबला निघून गेला. पुढे रीतसर केस चालली. माझ्यावर हल्ला झाला तेव्हा चाळीत काळोख होता व प्रत्यक्षदर्शी साक्षीदार नसल्यामुळे निष्णात वकिलाच्या युक्तीवादावर जगीरासिंग निर्दोष सुटला. ''आता यापुढे मी मुंबईत राहणार नाही.'' असे मालकाला सांगून तो कायमच्या वास्तव्यासाठी पंजाबला निघाला. निघायच्या अगोदर माझ्या खोलीत येवून आपली पगडी डोक्यावरून उतरवून माझ्या पायावर ठेवली व ''भट सहाब ! मुझे माफ करो मेरी और आपकी कोई दुश्मनी नही है । मालिक के कहने पर मैने आपके उपर हमला किया। मै और कभी इसतरफ वापीस आनेवाला नही हूँ। आप माफ किया ऐसे बोले नही तब तक मै पगडी सर पर नही पहनुँगा ।'' असे सांगून ढसाढसा रडू लागला त्यावेळी माझी बायको पण तिथे उपस्थित होती. आम्ही उभयतांनी त्याला 'माफ केलं आहे.' असे सांगितल्यावरच तो आपली पगडी घेवून निघून गेला. त्यानंतर जगीरासिंग पुन्हा कधीच नजरेस पडला नाही.

आमच्या चाळीतील बहुतांश भाडेकरू मुंबईतील विविध मिल्समध्ये तीन पाळ्यांमध्ये काम करणारे कामगार होते. त्यामुळे चाळीत दिवसरात्र पुरुष मंडळी हजर असायचीच. त्यापैकी काहीजण मला स्टेशनपर्यंत पोहचवायला येत व सायंकाळी मी कामावरून परतण्याच्या वेळेवर काही जण मला घरापर्यंत

संरक्षण देण्यासाठी म्हणून रेल्वे फलाटावर थांबून असायचे. जगीरासिंग कायमचा गेल्यावर ही पद्धत मी बंद करविली. यापुढेही मालकातर्फे गुंडगिरी होण्याचा संभव असल्यामुळे चाळ कमिटीने प्रत्येक खोलीमध्ये एक तरी लोखंडी शीग (सळी) लपवून ठेवावी असे ठरले. त्यासाठी एका कारखान्यातून शंभर सळ्या मागवून घेतल्या व त्याचे गुप्तपणे वितरण केले. वकिलांच्यातर्फे पाठविलेल्या नोटीसीला मालकाने अपेक्षेप्रमाणे जबाब दिला नाही. ठरल्याप्रमाणे मग आम्ही मालकाविरूद्ध 'Standard Rent' च्या केस दाखल केल्या. गोकुलदास तेजपाल हॉस्पिटलच्या पुढे असलेल्या 'पिके ट मारूती' मंदीराच्या शेजारील 'लघुवाद न्यायालयात' या केसेस दाखल करण्यात आल्या. एका चाळीसाठी एक स्वतंत्र केस, याप्रमाणे एकूण नऊ केसेस दाखल झाल्या. कोर्टाने दाव्याचा निकाल लागेपर्यंत मालकाला भाडे न देता कोर्टात जमा करण्याचे आदेश दिले. भाडेकरूच्या कडून दरमहा भाडे गोळा करून ते रीतसर कोर्टात भरून पावती आणण्याची जबाबदारी आम्हा पदाधिकाऱ्यांवर येवून पडली.

५७

एक दिवस विभागातील ''संयुक्त महाराष्ट्र समिती''नगरसेवक श्री. सिताराम जगताप व त्यांचे एक सहकारी श्री.जी.जी.पाटील हे मला शोधत घरी आले. श्री. जगताप हे भारतीय साम्यवादी पक्षाचे पूर्णवेळ कार्यकर्ते होते. ते लालबावटा मिलमजदूर संघटनेचे प्रमुख कार्यकर्तेपण होते. वांद्रे–खार –सांताक्रूझ – विलेपार्ले या विभागातील भाडेकरूंना विशेषतः झोपडपट्टीतील भाडेकरूंना संघटित करून ते लढा देत होते. पंजाबी चाळ कमिटीतील माझे धडाडीचे कार्य व नाविन्यपूर्ण संयोजन यांची माहिती ऐकून ते माझ्याकडे आले होते. स्वतंत्रपणे, एकेकाने मालकशाही विरूद्ध लढण्यापेक्षा संघटीतपणे लढा दिल्यास भाडेकरूंच्या व्यापक हिताचे ठरेल'' असे त्यांनी मला सुचविले. ''बृहन्मुंबई भाडेकरू परिषद''या नावाची मध्यवर्ती भाडेकरू संघटना मुंबई शहरभर कार्यरत होती. श्री.तु.कृ.सरमळकर हे त्या संघटनेचे कार्याध्यक्ष होते. शहरात विविध ठिकाणी परिषदेच्या शाखा होत्या. आमची चाळकमिटी त्या परिषदेत सामिल करून घ्यावी असे त्यांना वाटत होते. हा विषय महत्त्वाचा असल्यामुळे मी सर्वसाधारण सभा बोलावून काय ते कळवितो असे त्यांना सांगितले.

चाळ कमिटीच्या पुढील सर्वसाधारण सभेत सांगोपांगरीतीने चर्चा झाली.

त्यावर परिषदेच्या काही पदाधिकाऱ्यांनी आमच्या सभेत येवून मार्गदर्शन करावे व आमच्या शंकाकुशंकांना उत्तर द्यावे व त्यानंतरच काय तो निर्णय घ्यावा असे ठरले. त्यानुसार पुढील सर्वसाधारण सभेत सर्वश्री तुकाराम सरळमकर, सीताराम जगताप व भाडेकरू परिषदेचे कायदेविषयक सल्लागार हर्षदराय भट हे उपस्थित राहिले त्यांची भाषणे पार पडल्यावर भाडेकरूंनी उलट- सुलट प्रश्न विचारले सर्व प्रश्नांना समाधानकारक उत्तरे मिळाल्यावर आमची चाळकमिटी 'बृहन्मुंबई भाडेकरू परिषदे'ला संलग्न करण्याचा निर्णय घेण्यात आला. वांद्रे, खार व सांताक्रूज या विभागाची मिळून एक शाखा तयार केली गेली व त्या शाखेच्या चिटणीस म्हणून माझी नियुक्ती झाली. कालांतराने मी भाडेकरू परिषदेचा मुंबई शाखेच्या चिटणीस पदापर्यंत पोहोचलो होतो.

५८

माझे लग्न ठरल्यामुळे विठू व कृष्णा यांचा राहण्याचा प्रश्न निर्माण झाला. त्यावेळ पर्यंत माझ्या नेतृत्वाखाली अनेक चाळ कमिट्या स्थापन करण्यात आल्या होत्या. त्यातील प्रमुख म्हणजे - लालजी लक्ष्मण चाळ, अंगुठी-वाली चाळ, मुसायडणवाला चाळ, पासरनाथ चाळ, के. पी शर्मा चाळ, साईबाबा नगरचाळ, पाईपलाईन चाळ अशा एकूण बावीस चाळकमिट्या स्थापन झाल्या होत्या त्यातील अनेक चाळमालकांनी माझ्यावर गुंड घातले होते. मी माझ्या सरक्षणासाठी पुरेपूर काळजी घेवून काही निष्ठावंत कार्यकर्त्यांचे सुरक्षा कवच माझ्याभोवती तयार केले होते.

पारसनाथ चाळी जवळील एका चाळीत मी विठू व कृष्णा यांच्यासाठी खोली भाड्याने घेवून दिली तिथल्या खोलीत असताना विठूचा कडवाडचीच मुलगी, आता मुंबईत असलेली विठाबाई हिच्याशी प्रेमविवाह पार पडला त्यांचे लग्न वांद्रे येथील 'मॅरेज कोर्टा'त रजिस्टर पद्धतीने पार पडले त्या लग्नाला साक्षीदार म्हणून मी हजर होतो. सायंकाळी पारसनाथ चाळीतील पटांगणात सत्कार समारंभ पार पडला.

कृष्णाने विभागात रहात असलेल्या एका ख्रिश्चन मुलीला पळवून नेवून लग्न केले. कोठेतरी जाऊन ते दोघे रहायला लागले. त्याचा सासरा कृष्णाला मारण्यासाठी म्हणून तो बोरीवली येथे कामाला असलेल्या 'स्पेशल स्टील्स् लिमिटेड'' या कारखान्याच्या अवतीभोवती घिरट्या घालू लागला. ते आम्हाला

समजल्यावर कृष्णाला नोकरी सोडायला लावून बदलापूर येथील एका मित्राच्या मदतीने त्याला सपत्नीक तेथे रहायला पाठविले.

काही वर्षांनी मी नागपूरला एका अधिवेशनासाठी गेल्यावर तिथली विधानसभा बघायला गेलो होतो. तिथे एस. टी. कामगारांचा प्रचंड असा मोर्चा आला होता. तिथे जोरजोरात घोषणा देणारा कृष्णा आढळला. तो एस. टी. महामंडळात नोकरी करीत होता व युनियनचा एक प्रमुख कार्यकर्ता झाला होता. कृष्णाशी झालेली ही एक भेट वगळता खार सोडल्यापासून आणखी भेटी कधी झाल्या नाहीत. त्याला मुले झाल्यावर त्याचे आपल्या घरी व सासुरवाडीला बिघडलेले संबंध पूर्ववत झाले असे समजले.

विठू व त्याची पत्नी विठाबाई यांनी खार सोडून जोगेश्वरी येथील ओशीवारा ब्रिज जवळील 'सोहनसिंग मेन्शन' येथे चांगली जागा घेतली. हल्ली तो मुलांची लग्ने पार पडल्यावर निवृत्त होऊन मिरारोड येथे राहतो.

भाडेकरू परिषदेचे काम करताना माझी प्रत्येक चाळ कमिटीतील प्रमुख पदाधिकाऱ्यांची ओळख व मैत्री झाली. त्यातील काही जणांची नावे मला अजूनही आठवतात. श्री. बाळकृष्ण मोरे, श्री. दुधवडकर , श्री. एस. के. शेट्टी, श्री. मारुती कांबळे, श्री. बिरमुळे, श्री. गोवेकर, श्री. यशवंत तावडे, श्री परशुराम सावंत, श्री. अनंत उर्फ दादा सावंत, श्री. श्रीधर घाग, श्री. अनिल कदम इ. अनिल कदम नंतर वकील झाले, नोटरी बनले.

५९

१६ डिसेंबर १९६२ रोजी अंकोला येथे माझे लग्न पार पडले. पत्नीला घेऊन मुंबईला आल्यावर बऱ्याच काळापासून आजारी असलेले बाप्पा यांचे २० जानेवारी १९६३ रोजी निधन झाल्याची तार येऊन पोहचली. मी किंवा रामानंद त्यांच्या अंत्यक्रियेला पोहचू शकलो नाही. आईने धाकटे बंधू आनंदराय व राधाकृष्ण यांच्या मदतीने सर्व क्रियाकर्मे विधीवत् करून घेतली. मी नंतर गावी गेल्यावर बाप्पाच्या अस्थी आणून नाशिक येथील रामकुंड येथे विसर्जन केल्या. त्याच दिवशी दुपारी महाराष्ट्राचे मुख्यमंत्री श्री. वसंतराव. नाईक यांनी पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या अस्थीकलशाचे विसर्जन रामकुंडात केले. त्यावेळी गोदातटाकी लोकांची तुफान गर्दी जमली होती. भारतीय वायुसेनेच्या तीन विमानांनी रामकुंडावर व जमलेल्या जनसमुदायावर पुष्प वृष्टी केली. अंगावर पडलेल्या

फुलांच्या पाकळ्या जमविण्यासाठी लोकांची चेंगराचेंगरी झाली. मी पण काही पाकळ्या 'प्रसाद' म्हणून घरी आणल्या होत्या.

रामानंदाने ए.सी.सी. तील नोकरी सोडून उत्तरप्रदेशातील मिरजापूर जवळील रेणुकूट येथील हिंडेल्को (HINDALCO) या ॲल्युमिनीयम तयार करणाऱ्या प्रचंड कारखान्यात नोकरी धरली. त्याला तिथे लगेच क्वार्टर्स पण मिळाले. आईने त्याचे लग्न कारवार येथील श्री. मारूती बोरकर यांची एकुलती एक मुलगी रेखा हिच्याबरोबर जमविले. मी पत्नी अनुराधा, मुली पद्मीनी, नंदीनी व बहिण कुमुद यांच्यासह गावी गेलो. रामानंदाचे लग्न कारवार येथील मुरलीधर मठात थाटात पार पडले.

माझे लग्न झालेल्या काही दिवसांतच कुमुद माझ्याकडे राहायला आली. तिला गोकुळदास तेजपाल हॉस्पिटलमध्ये शिकावू नर्स म्हणून नोकरी लागली. तिला तिथल्या वसतीगृहात राहावे लागे. जेवणखाण, युनिफॉर्म व दवापाणी तिला बिनामोबदला मिळत होते व हातखर्चासाठी म्हणून काही रक्कम दरमहा मिळत असे. शनिवार-रविवार किंवा अन्य रजा असल्यावेळी ती आमच्याकडे रहायला येत असे.

चाळीत आता अनेक खोल्या बांधण्यात आल्या नवीन कुटुंबे रहायला आली त्यात कोकणातील मिल कामगाराच्या ओळखीने अन्य धर्माचे लोकपण यायला लागले. आता एकूण खोल्यांची संख्या ११० वर पोहचली. मालकाचे बगलबच्चे असलेली काही कुटुंबे सोडल्यास बाकी सर्व भाडेकरू आमच्या चाळकमिटीचे सभासद झाले.

चाळमालकाविरूद्ध आम्ही भाड्याची केस दाखल केली तरी आमच्या मालकाने पाण्याचे अधिक नळ दिले नाहीत वा ज्यादा संडासपण बांधून दिले नाहीत. त्यावर उपाय म्हणून भाडेकरू परिषदेच्या नेतृत्वाखाली साधारण ६०० लोकांचा मोर्चा हाती रिकामे हंडे घेऊन महापालिकेच्या एच-वॉर्डावर नेला. त्या मोर्चात बायका व मुलांचा सहभाग लक्षणीय असा होता. जवाहर नगरमधून महापालिकेवर गेलेला असा तो पहिलाच मोर्चा होता. त्यामुळे त्या मोर्चाचा संपूर्ण विभागात जोरदार बोलबाला झाला. श्री. जगताप हे नगरसेवक असल्यामुळे त्यांच्या पुढाकाराने महापालिकेतील बरेच उच्च अधिकारी चाळीत येऊन परिस्थितीची पाहणी करून गेले. त्या झोपडपट्ट्या अनिधकृत व बेकायदेशीर

होत्या. त्यामुळे मालकाचे धाबे दणाणले. मोर्चाच्या वेळी कायद्यानुसार आम्हाला पोलीस संरक्षण दिले होते. माझे वाढते संघटनाकौशल्य व आक्रमक भाषणे यांचे रिपोर्ट स्थानिक पोलीस स्टेशनला मिळत होते. बरेच सरकारी अधिकारी व पोलीस अधिकारी काही शासकीय योजना झोपडपट्टीत राबवण्यास माझे व माझ्या सहकाऱ्यांची मदत घेत असत. माझा विभागात वाढलेला दबदबा पाहून विभागातील चाळ मालक घाबरले. आपले हितरक्षण करण्यासाठी म्हणून दहा-बारा चाळ मालकांनी एकत्र येऊन 'चाळमालक संघटना' स्थापन केली.

६०

१९६४ साली अनुराधा गरोदर राहिली. प्रथेप्रमाणे तिचे पहिले बाळंतपण माहेरी होणे गरजेचे होते. पण सासू-सासऱ्यांनी आपल्याला आर्थिकदृष्ट्या बाळंतपण करवून घेणे शक्य होणार नाही असे कळविल्यामुळे मी कडवाडला बायकोला प्रसूतीसाठी पाठवण्याचे ठरविले. कामाच्या ताणामुळे मला बायकोला घेऊन गावी जाणे शक्य नव्हते. विभागातील माझे मित्र श्री. नरसिंह सुब्राय शेणवी हे आपल्या पत्नीला घेऊन तिच्या पहिल्या बाळंतपणासाठी गावी जाणार असल्याचे समजले. ते मुंबई ते कारवार बोटीने जाणार होते. माझ्या विनंतीनुसार नरसिंह याने माझ्या बायकोला कडवाडला माझ्या घरी पोहचविण्याची जबाबदारी आपल्या अंगावर घेतली. मी 'भाऊच्या धक्क्या'वर जाऊन त्यांना निरोप दिला.

महिन्याभराने आईचे सविस्तर पत्र आले. पत्नीचे बाळंतपण सुखरूपपणे पार पडून मुलगी झाली होती. जन्मताच त्या मुलीच्या तोंडावर पातळसे आवरण पसरलेले होते. गावातील अशिक्षित दाईला नवजात बालिकेच्या तोंडावरील आवरण दूर करून श्वासोच्छासाचा मार्ग मोकळा करावा ते सुचले नाही त्यामुळे माझ्या पहिल्या मुलीचे दुःखद निधन झाले. पुढे दोनएक महिन्यांनी गावी जाऊन मी पत्नीला घेऊन मुंबईला परतलो.

डि. व्हि. इंडस्ट्रीमधले माझे काम व चाळकमिट्यांचे काम जोरदारपणे चालले होते. मोरजे वकील यांचे काम आम्हाला समाधानकारक वाटत नव्हते. त्यमुळे आम्ही दुसऱ्या चांगल्या वकिलांच्या शोधात होतो. सांताक्रूज पूर्व येथे नवीनच हैदराबादहून रहायला आलेले श्री. तुकाराम अंबाजी बुकटे हे वकील कार्यालयासाठी म्हणून जागा शोधत आमच्या भाडेकरू परिषदेच्या स्थानिक कार्यालयात येऊन मला भेटले. आमच्या ओळखीने एक जागा मिळाली. श्री.

बुकटे वकील यांच्या कार्यालयाचे उद्घाटन नगरसेवक श्री. जगताप यांच्या हस्ते पार पडले. त्या कार्यक्रमात माझी श्रीमती मंजूताई गांधी या भारतीय साम्यवादी पक्षाच्या कार्यकर्त्या व महिला फेडरेशनच्या प्रमुख नेत्या यांची ओळख झाली. पुढे त्यांच्या पुढाकाराने विभागात महिला फेडरेशनची स्थापना करण्यात आली. सौ. . मालती बाळकृष्ण मोरे व माझी पत्नी यांच्या पुढाकाराने महिला फॅडरेशनच्या कामाला गती प्राप्त झाली. मंजू ताईच्यामुळे महिला फेडरेशनच्या अनेक कार्यकर्त्या व नेत्या यांची माझ्या घरी येण्या-जाण्याच्या खेपा वाढल्या. सौ. सुशीला पटेल (बॅरीस्टर रजनी पटेल यांच्या पत्नी ) सौ. तारा रेड्डी, सौ. कुसुम देशपांडे, सौ. लीलाताई जैन, सौ. अहिल्याबाई रंगणेकर श्रीमती मृणाल गोरे इत्यादींच्या ओळखी झाल्या. महिला फॅडरेशनने झोपडपट्टीतील मुले व महिलांच्यासाठी म्हणून अनेक शासकीय दूध व पाव, बटाटवड्याची केंद्रे उघडली. त्यामुळे अनेक बायकांना अर्धवेळ काम मिळाले व त्यांना थोडी अर्थिक मदत पण झाली.

६१

अनुराधा दुसऱ्यांदा गरोदर राहिली. या वेळी तिला बाळतंपणासाठी गावी न पाठवता मुंबईतच ते करून घ्यावे असे मी ठरविले. मदतीला येण्यासाठी सासूला कळविल्यावर त्यांनी आपली असमर्थता सांगितली. आईला काही काळासाठी माझ्याकडे मदतीला येण्याचे कळविले. येताना तिने आपल्या बरोबर माझा तिसऱ्या क्रमांकाचा भाऊ आनंदराय याला आणले.

आमच्या चाळीत डॉ. मिश्रा नावाचे गृहस्थ सपत्नीक राहायला आले होते. त्यांच्या सासऱ्यांचे माहिम येथे रेल्वे स्टेशनजवळ मोठे प्रसूतीगृह होते. तिथे मी डॉ.मिश्रा यांच्या ओळखीने अनुराधाचे नाव नोंदविले. दर महिन्याला तपासणीसाठी पत्नीला त्यांच्या दवाखान्यात घेऊन जावे लागे. नऊ महिने पूर्ण व्हायला आले तरी आईचा पत्ता नव्हता.म्हणून मी कामावर निघताना शेजाऱ्यांना वेळ पडल्यास पत्नीला माहिम येथील दवाखान्यात पोहचविण्याची विनंती केली होती. काही टॅक्सी चालक चाळीत राहत होते. ते आमच्या चाळ कमिटीचे सभासद पण होते. टॅक्सीसाठी व अन्य आपत्कालीन कामासाठी म्हणून मी बरीच रक्कम बायकोला देऊन ठेवली होती. त्यामुळे मी निर्धास्तपणे कामाला जाऊ शकत असे. माझी बहिण कुमुद आता प्रशिक्षित नर्स होऊन जि.टि.हॉस्पिटलमध्ये पूर्ण वेळ नर्स म्हणून कामाला लागली होती ती अधूनमधून

घरी येऊन बायकोला तपासून जात असे.

एक दिवस दुपारी कार्यालयात मला माहिम येथील प्रसूतीगृहातून दूरध्वनी आला. माझी बायको सुखरूपपणे बाळंत होऊन मुलगी झाल्याची आनंदाची बातमी मला दिली गेली. तात्काळ मी मालक राडीया शेटला सांगून माहिम येथील प्रसूतीगृहात पोहोचलो.

प्रसूतीगृहात पोहोचलो तेव्हा बायकोच्या कुशीत सफेद कपड्यात गुंडाळलेली गोल चेहऱ्याची, गोरी गोरी पान मुलगी झोपलेली होती. तिचे लांबलचक केस आकर्षक दिसत होते. उजव्या हाताच्या अंगठ्याजवळील दोन बोटे तोंडात घालून ती आरामात झोपलेली होती. तिला पाहताच तिचे नाव 'पद्मिनी' ठेवावे असे मी ठरवून टाकले. तिचे ओठ जांभळे जांभळे दिसत होते म्हणून मी बाजूला असलेल्या नर्सला विचारले.''उष्णतेमुळे तिची जीभ व ओठ लाल झालेले दिसत असल्यामुळे आम्ही जांभळ्या रंगाचे औषध तिच्या ओठांना व जिभेला लावलेले आहे.'' असे नर्स म्हणाली. दहाव्या दिवशी मी टॅक्सीने बायको व मुलीला घेऊन घरी पोहोचलो तर माझी आई व आनंदराय शेजाऱ्यांकडे आमचीच वाट बघत होते. दादर शिवाजी पार्क येथे श्री. माधव ढोपळे नावाचे नातेवाईक राहत होते. त्यांची पत्नी कमला ही माझ्या आईची बालमैत्रीण. आई कारवारहून मुंबईला बोटीने येताना कमल तिच्याबरोबर होती. तिने आईला, ''तुम्हाला हवे असल्यास जुने पाळणे घेऊन जायला हरकत नाही.'' असे सुचविले होते. पूर्वीच्या रूढीप्रमाणे नवजात (पहिल्या) बालकासाठी नवे पाळणे न आणता कुणाचे तरी जुने पाळणे आणायची प्रथा होती. आईच्या सांगण्यानुसार दुसऱ्या दिवशी मी शिवाजी पार्कला जाऊन ढोपाळेयांच्या घरून टॅक्सीने पाळणे घरी घेऊन आलो. बारशाच्या दिवशी माझे बरेच नातेवाईक आलेले होते.

आनंदराय हा माझा भाऊ लहानपणापासून मतिमंद असा होता. त्यामुळे त्याची शिक्षणात प्रगती होत नव्हती. एकेका वर्गात तो दोनतीन वर्षे काढायचा. मी आनंदरायला मुंबईत ठेऊन घेऊन कोणतीतरी वृत्ती शिकवावी, तो काहीतरी अर्थार्जन करील अशी काहीतरी तजबीज करावी असे आईचे म्हणणे होते. त्यानुसार आनंदरायला आमच्याकडे ठेऊन आई गावी परतली.

६२

माझी बायको माहेरी असताना तिने चरख्यावर सूत (खादी) काढून

अनेक टॉवेल्स व टेबलक्लॉथ वगैरे बनविले होते. मुंबईला येताना तिने आपला बंदपेटीचा चरखा सोबत आणला होता आनंदरायला मी व बायकोने त्या चरख्यावर सूत काढायचे शिकवले. काही दिवसात तो चांगले सूत काढायला शिकला. सुताच्या बऱ्याच लड्या तयार झाल्यावर मी फोर्टमधील खादी भांडारमध्ये नेऊन देऊन त्याचे पैसे आणयचो. त्याच्या मिळकतीचे पैसे आम्ही एका डब्यात टाकले साधारण सहा महिने सूतकताईचे काम केल्यावर आनंदरायच कंटाळला व त्याने सूत काढायचे बंद केले. आता आनंदरायाचे काय करायचे ? याबाबत मी विचार करायला लागलो. आमच्या चाळीच्या शेजारी श्री. सुंदर शेट्टी नावाचे माझे मित्र टेलरिंग शॉप चालवीत असत. एक दिवस मी त्यांच्या दुकानात आनंदरायाच्या वयाचाच मुलगा शिवणकाम शिकायला म्हणून आलेला पाहिला. सोबत त्याचे वडीलपण होते. त्यांच्यात चाललेला संवाद मी लक्षपूर्वक ऐकत होतो. ते निघून गेल्यावर मी शेट्टीला माझ्या भाऊला पण शिवणकला शिकविण्यासाठी विचारले. श्री शेट्टी यांच्या दुकानाबाबत त्यांचे व दुकान मालकाचे काही भांडण होते ते मी पूर्वी माझ्या मध्यस्थीने मिटविले होते. त्यमुळे शेट्टी मी काही सांगितले ते काम तत्परतेने करायचा.

दुसऱ्या दिवसापासून आनंदराय शेट्टी यांच्या दुकानात जाऊ लागला. साधारण महिनाभर शिकवणकाम शिकल्यानंतर त्याला कंटाळा यायला लागला म्हणून आनंदरायने शिलाईचे शिक्षण सोडून दिले दिवसरात्र तो झोपा काढायचा. बायकोने सांगितल्यास घरातील काही जुजबी कामे तो करायचा. मी सविस्तर पत्र लिहून आईला सर्व वृत्तांत कळवला व आनंदरायाचे पुढे काय करायचे त्याबाबत विचारणा केली. महिनाभर झाला तरी आईकडून माझ्या पत्राचे उत्तर आले नाही. साधारण आणखी एका महिन्याने आई अकस्मात येऊन पोहचली. ती कुणाच्या तरी सोबतीने बोटीने मुंबईला आलेली होती. आल्याआल्याच तिने माझ्यावर व बायकोवर आनंदरायाच्या बाबतीत आरोप करायला सुरूवात केली. ''तुम्हाला घरकामासाठी आनंदराय मिळावा म्हणून तुम्ही त्याला कोणताही नीट मार्ग दाखवीत नाही. तू जसा रामानंदाला व कुमूदाला मार्गी लावले होते तसे आनंदरायाला पण नीट मार्गी लावू शकतोस .. . ''आम्ही आनंदरायाकडून घरकाम करून घेतो असे तुला कोणी सांगितले'' असे विचारल्यावर आईने ''कुणाकडून तरी समजले आहे.'' असे मोघमपणे सांगितले. त्यावरून कोणीतरी ''नारदगिरी''

केलेली आहे. हे मी जाणले. पण मी त्या विषयात अधिक खोलात न जाता. मुद्द्याचा (आनंदरायाचा) विषय काढला त्यावर, ''मी आनंदरायाला घेऊन गावी जाते. त्याचे काय करायचे ते मी ठरवीन. तू त्याची काळजी करू नकोस.'' असे आई म्हणाली. काही दिवसांनी आनंदराय व आईला मी गावी पाठवून दिले.

६३

चाळकमिटीचे काम व्यवस्थितपणे चालले होते. चाळीतील मुलांसाठी काहीतरी कार्यक्रम राबवावा या इराद्याने मी ''बाल-मित्र लेझीम पथक'' ही संस्था स्थापन केली. चाळीतील व अन्य चाळींमधून मिळून साधारण तीस-पस्तीस मुले आमच्या पथकात सामील झाली. विभागातील लोकांकडून व दुकानदारांकडून वर्गणी काढून मुलामुलींसाठी युनिफॉर्म व लेझीम तसेच ढोल आणले. शास्त्रशुद्ध पद्धतीने लेझीम शिकविण्यासाठी तज्ञ शिक्षक नेमले. साधारण दोन-एक महिने शिक्षण पूर्ण झाल्यावर एक दिवस जवाहरनगर भागात निळा गणवेश केलेल्या , गळ्यात लाल रंगाचा रूमाल बांधलेल्या मुलामुलींचे पथक गुलाल उधळीत मिरवणुकीने मिरवत आले. मिरवणुकीसाठी काही जवान मुलांनी लाठ्या-काठ्यांचा खेळ खेळत रंगत आणली होती. आम्ही मिरवणुकीसाठी म्हणून रीतसर पोलीस परवानगी घेतली होती. ते माहित नसल्यामुळे 'चाळ मालक संघटनेने' आमची भाडेकरू परिषद, भागातील शांतता बिघडवीत असल्याची लेखी तक्रार थेट पोलीस कमीशनरांच्या कार्यालयात केली. त्यामुळे मला स्पेशल क्राईम ब्रॅंचकडून चौकशीसाठी बोलावून घेण्यात आले. माझे तिथे सविस्तर स्टेटमेंट नोंदवून घेण्यात आले. मी स्थानिक पोलीस स्टेशनची परवानगी घेतली त्याची प्रत त्यांना सादर केली. त्यामुळे तपास अधिकाऱ्यांचे समाधान झाले. चाळमालक संघटनेला, माझ्या विरूद्ध खोटी तक्रार नोंदविल्याबद्दल त्यांना ताकीद देण्याचे पत्र पाठविणार असल्याचे सांगितले. तशा प्रकारचे पत्र चाळमालक संघटनेचे अध्यक्ष श्री. लालजी लक्ष्मण राजपूत यांना स्थानिक पोलीस स्टेशन कडून पाठविले गेल्याचे नंतर समजले.

कुमूदचे ट्रेंनिग पूर्ण होऊन जि. टि. हॉस्पिटलमध्ये नोकरी करून ती तिथून बाहेर पडली. त्यानंतर काही दिवस तिने मालाड येथील एका खाजगी हॉस्पिटलमध्ये नोकरी केली. तिथे राहण्याची सोय नसल्यामुळे तिला माझ्या घरून मालाडपर्यंत जाणे येणे त्रासदायक होत होते. कुणाच्यातरी ओळखीने

तिला टाटा कॅंसर हॉस्पिटलमध्ये नोकरी लागली. तिथे कामाला असतानाच एक दिवस तिने मला आपण रामानंदाचे मेहुणे श्री. शरद मारूती बोरकर यांच्याशी लग्न करणार असे सांगितले. उन्हाळ्याच्या सुट्टीत गावी गेल्यावेळी त्यांचे प्रेमसंबंध जुळले होते असे समजले. मागील वर्षभर त्यांनी एकमेकांना प्रेमपत्रे पाठवून कारवार व मुंबई येथील पोस्टमन लोकांना हैराण करून टाकले होते. मी सहकुटुंब गावी जाऊन कडवाड येथील आमच्या घरी त्यांचे लग्न साग्रसंगीतपणे लावून दिले. रेणूकुटहून रामानंदपण त्या लग्नाला सहकुटुंब आला होता.

एकोणीशे सहासष्ठ साल उजाडले. माझी डि. व्हि. इंडस्ट्रीजमधली नोकरी व्यवस्थित चालली होती. अनुराधा दुसऱ्यांदा गरोदर राहिली. यावेळी पण तिला बाळंतपणासाठी माहिम येथील डॉ. मिश्रा यांच्या प्रसूतीगृहात दाखल केले. आठ फेब्रुवारी एकोणीशे सहासष्ठ रोजी पत्नी प्रसूत होऊन मुलगी झाल्याची बातमी समजली. मी ताबडतोब हॉस्पिटलमध्ये पोहोचलो. डोक्यावर एकही केस नसलेली (गोटा सुळसुळीत असलेली) गोल चेहऱ्याची डाव्या हाताचा अंगठा चोखत असलेली मुलगी पाहिली. तिचे मी नंदिनी म्हणून नामकरण करण्याचे ठरविले. या वेळच्या बाळंतपणासाठी येऊ शकणार नाही असे आईने अगोदरच कळविले होते. कार्यालयात सुट्टी मिळणे शक्य नव्हते. त्यामुळे मी थोरली मुलगी पद्मिनी हिला कुठे ठेवायचे या धर्मसंकटात सापडलो होतो. आमच्या चाळीच्या शेजारी तेजसिंग पंजाबी चाळ होती. तिथे पै नावाचे कुटुंब राहात होते. त्यांचा व आमचा चांगलाच घरोबा होता. पै यांची पत्नी 'बायाक्का' यांनी पद्मिनीला ठेवून घेण्याचे मान्य केले त्यानुसार मी तिला कामावर जाताना बायक्काच्या हवाली करून जात असे. सायंकाळी कामावरून परतताना हॉस्पिटलमध्ये जाऊन मग घरी येई. तेव्हा मी पद्मिनीला माझ्याबरोबर खोलीवर घेऊन जाई. रात्रीचे जेवण मी घरी बनवत असे. बायकोला प्रसुतीगृहातून घरी आणल्यावर मी महिनाभराची सुट्टी घेतली.

६४

मी डि. व्हि. इंस्ट्रीमधील नोकरी सोडून ''मॅंगो -रविंद्र लॅबोरॅट्रीज'' या औषध कंपनीत कामाला लागलो. वर्षभराने कंपनीने आपले कार्यालय मुंबई येथून हलवून अहमदाबाद येथील त्यांच्या कारखान्याच्या आवारात स्थलांतरित केले. मुंबईतील कर्मचाऱ्यांना अहमदाबाद येथे हजर होण्याचे आदेश देण्यात

आले. पण मुंबई सोडून कोणीही अहमदाबादला जाण्यास तयार नव्हता. त्यामुळे सर्वांनी आपापले राजीनामे सादर केले. मुंबईहून सर्व सामान, फाईल्स इ. अहमदाबादला पाठविण्यात आले पण तेथील लोकांना कागदपत्रे, फाईल्स इ. व्यवस्थितपणे मांडण्यास अडचणी यायला लागल्या. अध्यक्षांनी मला तीन महिन्यांसाठी अहमदाबादला येवून तेथे कार्यालय व्यवस्थितपणे थाटून देण्याचे आमंत्रण दिले. त्याबद्दल भरघोस मासिक वेतन, राहण्याची सुविधा उपलब्ध करून दिल्या. ठरल्याप्रमाणे तीन महिन्यांच्या अवधीत काम पूर्ण करून मी मुंबईला परतलो. माझे पूर्वीचे साहेब श्री. रामू पंडित यांच्या ओळखीने मला ''बार कौंसिल ऑफ महाराष्ट्र ॲण्ड गोवा.'' या कार्यालयात नोकरी मिळाली.

आमचे एक उत्साही कार्यकर्ते श्री. बाळकृष्ण मोरे विभागात 'आदर्श कला मंडळ' चालवीत असत. दरवर्षी दिवाळीत ते चार दिवसांचा कार्यक्रम ठेवीत. मला त्यांनी आपल्या संस्थेत सल्लागार म्हणून घेतल्यावर मी अनेक तऱ्हेचे उपक्रम सुरू केले. निबंध स्पर्धा, चित्रकला स्पर्धा, मुलांसाठी विविध प्रकारचे खेळ, सुदृढ बालक स्पर्धा अशा प्रकारचे कार्यक्रम आम्ही घेत असू. शेवटच्या दिवशी नामवंतांच्या हस्ते विजेत्यांना परितोषिके दिली जायची. अशा कार्यक्रमासाठी नाट्य कलावंत श्री. सतीश दुभाषी, सिने कलावंत नर्गीस व ए. के. हंगल इत्यादिंना आमंत्रित केलेले होते. नर्गीस ही माझी आवडती नटी, तिला आमच्या कार्यक्रमासाठी आणण्यासाठी मला आमचे फौजदारी वकील श्री. शिराज निमचवाला यांची ओळख व मध्यस्थी उपयोगाला आली होती.

त्यावेळी 'संयुक्त महाराष्ट्र समीती'चे कामकाज महाराष्ट्राभर जोरात चालले होते. भाषावार प्रांत रचना करताना पूर्वीचा 'बॉम्बे प्रोव्हिन्स' हा प्रांत तोडून महाराष्ट्र व गुजरात अशी राज्यरचना करावी असे ठरले. मध्यंतरी मुंबईचे स्वतंत्र राज्य करून महाराष्ट्र व गुजरात यांचे द्वैभाषिक राज्य निर्माण करायचे असे ठरले. भारतभर भाषावार राज्यरचना करणार असताना महाराष्ट्र व गुजरातसाठी वेगळी भूमिका काँग्रेस सरकारने घेतल्याचे पाहून महाराष्ट्रभर मोठा संघर्ष उभा राहिला. ''मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे.'' अशी घोषणा देत महाराष्ट्रातील खेड्यापाड्यातून सरकारच्याविरूद्ध संघर्षाच्या ठिणग्या उडायला लागल्या. त्याचवेळी ''विशाल गुजरात'' नावाच्या संघर्ष समितीने गुजरातसाठी वेगळे भाषिक राज्य व्हावे म्हणून तिथे मोठा संघर्ष उभा केला होता. कॉम्रेड

# जांबावली ते आंबीवली

श्रीपाद अमृत डांगे, साथी एस्.एम.जोशी, आचार्य अत्रे इ. नेत्यांची दर दिवशी सायंकाळी दादर येथील शिवाजी पार्कवर विराट सभा व्हायच्या. त्या सभांना मी रोज हजेरीलावायचो. आमच्या विभागात पण संयुक्त महाराष्ट्र समितीची शाखा उघडण्यात आली. त्या कमिटीवर एक प्रमुख कार्यकर्ता म्हणून मी कार्यरत होतो.

आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांच्या हस्ते विभागात नव्याने बांधलेल्या 'श्री छत्रपती शिवाजी वाचनालय' या वास्तूचे उद्‌घाटन करण्यात आले. तिथेच समितीचे कार्यालय थाटण्यात आले.मराठी भाषिकांचे राज्य व्हावे म्हणून जिकडे-तिकडे संप, हरताळ,मिरवणूका, नेत्यांची भाषणे यांचा धूमधडाका चालला होता. संघर्षासाठी लोकांना चेतवण्याचे काम गावोगावी जाऊन शाहिर मंडळी करीत होती.शाहीर अमर शेख, शाहीर अण्णा भाऊ साठे, शाहीर उस्मान चांद, शाहीर गवाणकर इत्यादींनी आपापल्या कला पथकाच्या मदतीने संपूर्ण महाराष्ट्र ढवळून काढला होता. त्या काळात मी एक वक्ता म्हणून नावारूपाला यायला लागलो.

संयुक्त महाराष्ट्र समितीचा लढा शिगेला पोहोचला होता. पण भांडवलदारी व काँग्रेसधार्जिणी इंग्रजी वृत्तपत्रे मात्र त्या विस्तृत लढ्याच्या बातम्या क्वचितच द्यायच्या. समितीच्या प्रचारासाठी एक मराठी दैनिक असावे असा विचार पुढे आला. प्रत्येक मराठी माणसामागे किमान एक रुपया जमवून तो निधी समितीच्या कार्यालयाकडे पोहचवावा असे आवाहन भव्य सभेत करण्यात आले त्यासाठी विभागावार कमिटया कामाला लागल्या. महिन्याभरातच महाराष्ट्रातील कानाकोपऱ्यातून लाखो रूपयांचा निधी गोळा झाला. त्या निधीतून आचार्य अत्रे यांच्या संपादकत्वाखाली 'मराठा' नावाचे दैनिक सुरू करण्यात आले त्याअगोदर काही वर्षापासून आचार्य अत्रे 'नवयुग' नावाचे साप्ताहिक चालवीत असत. मराठा दैनिकासाठी आम्ही आमच्या विभागातून निधी उभा करून दिला होता. समितीचा लढा हळूहळू काँग्रेसविरूद्ध अन्य राजकीय पक्ष असा पेटू लागला. भारतीय कम्युनिस्ट पक्ष, समाजवादी पक्ष, भारतीय जनसंघ, लाला निशाण कक्ष, रिपब्लिकन पार्टी ऑफ इंडिया असे अनेक पक्ष एकत्रित आले होते

नंदिनीच्या बारश्याच्या वेळी मी नवीनअॅल्युमिनिअमचा पाळणा आणला. ती मोठी झाल्यावर चाळीतील अनेक घरांतून मो पाळणा फिरत राहिला. आपलं काम झालं की पाळणा परत माझ्या खोलीवर यायचा दोन मुली झाल्यावर संतती नियमन ऑपरेशन करून घ्यावे असे विचार माझ्या मनात घोळू लागले.

त्याबद्दल मी बायकोचा सल्ला घेतला. चार वर्षांत एकूण तीन बाळंतपणे पार पडल्यामुळे बायको पण आणखी मुले होण्यासाठी उत्सुक नव्हती. त्यातच माझी सासू किंवा आई बाळंतपणासाठी मदत करण्यासाठी यायला उत्सुक दिसत नव्हत्या. वाढत्या महागाईचा पण प्रश्न होताच. माझे विचार जेव्हा नातेवाईकांपर्यंत पोहचले तेव्हा एकच हल्लकल्लोळ माजला. ''मुलगा नाही तर मोक्ष नाही. वंश क्षय होतो. मरणोत्तर, आई–वडिलांना पिडंदान होत नाही.'' इत्यादी अनाहूत सल्ले व उपदेश चारी बाजूंनी यायला लागले. ''माझा भाऊ रामानंद याला दोन मुलगे आहेत त्यामुळे आमचा वंश क्षय होण्याची भीती नाही. शिवाय मुलगा व मुलगी यांच्यात मी फरक मानत नाही. मानवी मेंदूला लिंगाची आडकाठी येत नाही. इंदिरा गांधी, मादाम क्युरी अशी अनेक उदाहरणे आहेत की मुलींनी वडिलांची कीर्ती जगभर पसरलवलेली आहे. योग्य शिक्षण दिल्यास मुलीपण मुलांच्या एवढेच सक्षमपणे जीवनात उभ्या राहू शकतात.'' अशा प्रकारचे माझे विचार मी सर्वांना सांगत होतो. पुढे मी दादर येथील फडके नर्सिंग होममध्ये नसबंदीचे ऑपरेशन करून घेतले.

दोन्ही मुली जन्मल्यावेळी मी प्रसूतीगृहात, कार्यालयात, शेजारी–पाजारी तसेच बारश्याच्या वेळी सर्वांना पेढे वाटले होते. अनेकांनी त्यावर टीका केली. ''मुलगा झाला तर पेढे, मुलगी झाली तर बर्फी'' असा प्रघात असताना आपण मुली झाल्या तरी पेढे वाटले याचे आश्चर्य वाटले.'' त्यावर, ''मुलगा व मुलगी यांच्या जन्माबद्दलच्या आनंदात भेदभाव मानणे हे गैरे आहे. लिंगभेद सोडला तर मुलामुलींचे देह व मन एकच असते. मुले ही देवाने दिलेली देणगी आहे असे जर आम्ही मानतो तर त्या देवाने दिलेल्या जिवात भेदभाव करण्याचा माणसाला अधिकार नाही.'' असे मी सर्वांना ठणकावून सांगत असे.

६५

विभागात काही सामाजिक कार्य करावे या उद्देशाने मी, श्री. बाळकृष्ण मोरे, श्री. मारूती माने, श्री. दुधवडकर, श्री. नारायणन् इ. युवकांच्या मदतीने ''पुरोगामी युवक मंडळ'' नावाची सामाजिक संस्था स्थापन केली. कधीतरी सभा घेण्याच्या व्यतिरिक्त शिवाजी वाचनालय रिकामेच असायचे. त्या जागेचा उपयोग करून घ्यावा म्हणून मी सोमवार ते शनिवार, रात्री आठ ते दहाच्या दरम्यान मोफत इंग्रजी व हिंदी शिकविण्याचे वर्ग सुरू केले. सलग चार वर्षे मी

असे वर्ग तिथे चालविले त्याचा फायदा अनेक विद्यार्थी-विद्यार्थीनींनी घेतला माझ्या कामातून स्फूर्ती घेऊन पुढे काही युवकांनी विभागात सर्व विषय शिकविण्याचे नाममात्र शुल्क घेऊन वर्ग सुरू केले. त्या युवकांपैकी किशोर यांचे नाव अजून आठवणीत आहे.

दिवसा वाचनालय बंदच असायचे नाखरे नावाच्या बाई आपण तिथे अल्प फी घेऊन 'शिशुविहार' सुरू करते असे म्हणाली म्हणून त्यांना सायंकाळी तीन ते पाच दरम्यान जागा वापरायला दिली, नाखरे बाईच्या वर्गात माझ्या दोन्ही मुलीं पद्मिनी -नंदिनी जाऊ लागल्या पद्मिनी कायम दाराजवळची जागा पकडून बसायची. त्यांना घरी घेऊन जायला आई येत आहे असे पाहताच पद्मिनी वर्गातून सुसाट पळत जायची. त्यावरून आम्ही तिला पुष्कळ चिडवायचो. पुरोगामी युवक मंडळातर्फे विविध क्षेत्रातील मान्यवरांना आणून त्यांची भाषणे ठेवावी असा विचार पक्का झाला. तशा प्रकारच्या व्याख्यानामालेचा शुभारंभ 'मराठा' दैनिकाचे उपसंपादक श्री. विनायक भावे यांच्या हस्ते करण्यात आला मुंबईतील अनेक विचारवंतांनी तिथे येऊन भाषणे केलेली आहेत. त्या उपक्रमांना पुढे श्रोतांचा प्रतिसाद कमी होत गेल्यामुळे साधारण वर्षभराने आम्ही व्याख्यानमाला थांबविली.

विभागात रेल्वेपूल उतरल्याबरोबर महानगरपालिकेतर्फे चालवली जाणारी प्राथमिक शाळा होती शाळेला भिंतीच्याऐवजी पत्रे व वर ॲल्युमिनिअम पत्र्यांचे छत होते एका पावसाळ्यात शाळेच्या मागच्या बाजूचे दोन पत्रे तुटून पडले. त्यामुळे शाळा संपल्यावर तिथे कुत्री, मांजरे, शेळ्या इत्यादी जाऊन घाण करू लागले त्यातच काही बेवड्या लोकांनी रात्रीला त्या शाळेचा 'तळीरामाचा अड्डा' बनविला. स्थानिक काँग्रेसचे नगरसेवक श्री. अ रा खैरे यांना आम्ही मंडळाच्या वतीने भेटून लेखी निवेदन दिले पण त्याचा काही उपयोग झाला नाही पालक व एकूणच जनतेचा मनात प्रचंड राग खदखदत होता आमच्या पुरोगामी युवक मंडळाने हा विषय हातात घेऊन तडीला न्यायचा असा विचार केला.

श्री सिताराम जगताप आता नगरसेवक नव्हते पण माजी नगरसेवक या नात्याने आम्ही त्यांच्या नेतृत्वाखाली मुंबई महानगरपालिकेचे महापौर श्री. डिसोजा यांना जाऊन भेटलो. जाताना आम्ही शाळेची दुरावस्था दाखविणारे अनेक फोटो पण घेऊन गेलो होतो. महापौरांनी ताबडतोब कार्यालयात हजर

असलेले डेप्युटी कमिशनर श्री. शास्त्री यांना बोलावून घेतले व शाळेचा प्रश्न लवकरात लवकर सोडवावा असे आदेश दिले. त्याच दिवशी सायंकाही सर फिरोजशाह मेहता रोडवरील 'ब्रिस्टॉल ग्रिल' या उपाहारगृहात वार्ताहार परिषद घेतली. त्या वार्ताहर परिषदेत आम्ही निवेदनाच्या सोबत शाळेच्या दुर्दशेचे फोटोपण वितरित केले. आयुष्यात पहिल्यांदाच मी वार्ताहर परिषदेत सहभाग घेतला होता. दुसऱ्या दिवशीच्या सर्व प्रमुख मराठी व इंग्रजी वर्तमानपत्रांतून शाळेचे फोटो, बातमी व आमची नावे झळकली. त्यामुळे विभागात सर्वत्र लोकांची उत्सुकता वाढली.

महिनाभर निघून गेला तरी महानगरपालिकेकडून शाळेच्या दुरूस्तीबाबत कोणतीही हालचाल दिसून आली नाही. पंधरा ऑगस्टचा स्वातंत्र दिन जवळ आला होता. त्या दिवशी आम्ही पुरोगामी युवक मंडळातर्फे शाळेसमोर झेंडावंदन करून एक दिवसाचे लाक्षणिक उपोषण करण्याची बातमी वर्तमानपत्रांतून छापून आणली. स्थानिक पोलीसांच्यातर्फे सरकार दरबारी ती बातमी पोचली. प्रसिद्ध झालेली बातमी वाचून महानगरपालिकासभेत मोठी खडाजंगी झाली. पंधरा ऑगस्टच्या दिवशी शाळेसमोरील लहानशा पटांगणात झेंडावंदन केले व रस्त्यावर उभारलेल्या लहानशा मंडपामध्ये उपोषणाला बसलो. उत्स्फूर्तपणे शाळेतील विद्यार्थी–विद्यार्थिंनी आमच्यासोबत उपोषणाला येऊन बसल्या. अनेक पालकांनी भेटून आम्हाला उत्साहित केले. दुपारी बारा वाजल्यापासून महापौर, कमिशनर, शिक्षण समितीचे अध्यक्ष व अनेक नगरसेवक आपापल्या गाड्या घेऊन उपोषणाच्या ठिकाणी पोहोचले. त्यामुळे जवाहरनगर•मध्ये वाहतुकीची प्रचंड कोंडी निर्माण झाली. विभागात महापौर आले ही बातमी समजताच स्थानिक पोलीस स्टेशनने बंदोबस्त वाढविला. वाहतूक नियंत्रण पोलीसांना पाचारण करण्यात आले.अशा प्रकारचा कार्यक्रम विभागात यापूर्वी झालेला नव्हता. त्यामुळे बघ्यांची प्रचंड गर्दी झालेली होती. उपोषणाच्या ठिकाणी आलेल्या मान्यवरांनी, वर्तमानपत्रांच्या वार्ताहरांनी शाळेची दुरावस्था व आजूबाजूची घाण बघून सखेदाश्चर्य प्रकट केले. सायंकाही सहा वाजता महापौरांनी या प्रश्नात लक्ष घालून आपत्कालीन बाब म्हणून पंधरा दिवसांच्या आत शाळा व परिसर चकाचक करून देतो असे सांगून आम्हाला उपोषण थांबविण्याची विनंती केली. शहाळ्याचे पाणी महापौरांच्या हस्ते घेऊन आम्ही उपोषण सोडले. त्यावेळी काही उत्साही

कार्यकत्यांनी विजयाच्या घोषणा दिल्या. त्या गर्दीत लपून राहून नगरसेवक खैरे जयद्रथाप्रमाणे आपले तोंड लपवून उभे होते. महापौरांच्या आश्वासनाप्रमाणे पंधरवाड्यातच शाळेची दुरूस्ती व परिसराची साफसफाई पार पडली. त्यामुळे विभागात आमच्या मंडळाचा दबदबा बराच वाढला.

६६

एक दिवस श्री सीताराम जगताप माझ्या घरी आले अजूनपर्यंत ते वांद्रे पूर्व येथील हौसिंग बोर्ड येथ राहत होते आता त्यांनी ती जागा सोडून माहीम दर्ग्याजवळील आजी-माजी नगरसेवकांसाठी बांधण्यात आलेल्या वास्तूत जाण्याचे ठरविले त्यांची पत्नी उषाताई या भारतीय महिला फेडरेशनच्या कार्यकर्त्या होत्या. त्यामुळे त्यांची व माझ्या पत्नीची जवळ-जवळ रोज गाठभेट व्हायची.त्यांच्या मुली शैला व सुरेखा तसेच मुलगे उदय व अरूण यांची माझ्या मुलींशी चांगली गट्टी जमलेली होती.जगताप कुटुंब माहीमला राहायला गेल्यावर आम्ही सहकुटुंब त्यांच्याकडे अनेकवेळा राहून आलेलो आहोत ''आपण आता या विभागापासून दूर रहायला जाणार असल्यामुळे पूर्वीसारखे आपण फिरू शकणार नाही ''असे त्यांनी सांगितले भाडेकरू परिषदेचे कार्यकर्ते माझे मित्र श्री बाळकृष्ण मोरे हे साम्यवादी पक्षाचे सभासद होते मी पण पक्षाचा सभासद झाल्यास विभागातील पक्ष कार्याला उठाव येईल असे त्यांनी सुचविले भाडेकरू परिषद,पक्ष,महिला फॅडेरेशन,युवक मंडळ यांच्या कार्यासाठी विभागात आपण एक मोठे कार्यालय उभारून देऊ असे त्यांनी आश्वासन दिले त्या विषयावर आमच्यात अनेकवेळा चर्चा होऊन मी त्यांच्या सूचनेला अखेर मान्यता दिली आश्वासन दिल्याप्रमाणे श्री जगताप यांनी जवाहरनगर येथील गोळीबार मैदानाजवळील मोठे कार्यालय उभारून दिले त्या कार्यालयाचे उद्घाटन गिरणी कामगारांचे प्रमुख पुढारी,आमदार गुलाबराव गणाचार्य यांच्या हस्ते पार पडले पुढे आमदार गणाचार्य महाराष्ट्र विधान सभेतील विरोधी पक्षनेते झाले त्यांच्या मदतीने आम्ही अनेक प्रश्नांची सरकारी दरबारी तड लावून घेतली होती

वांद्रे पूर्व येथे हायवे जवळ कार्डिनल ग्रेशस हाईस्कूल नावाची अद्यावत अशी शाळा सुरू झाली शाळेजवळील हाऊसिंग बोर्डची वसाहत सोडल्यास आजूबाजूला प्रचंड अशी झोपडपट्टी होती इंग्रजी माध्यमाची शाळा असल्यामुळे तिथे आपल्या पाल्यांना पाठवण्यास पालक बिचकत होते शाळेतील प्रमुख

फादर अन्य काही जणांना घेऊन मला व इतर पक्षातील कार्यकर्त्यांना भेटले ''आम्ही कोणत्याही प्रकारचे डोनेशन घेणार नाही, तसेच विद्यार्थ्यांना कोणतेही धार्मिक शिक्षण (ख्रिश्चन धर्माचे) देणार नाही, मुलींनी कुंकू लावण्यास, रिबीन घालण्यास, हातात बांगड्या घालण्यास आमचा विरोध राहणार नाही.'' असे त्यांनी सांगितले. त्यामुळे आम्ही काही प्रमुख कार्यकर्त्यांनी आपली मुले त्या शाळेत घातली.शाळेतील शिक्षणाची उत्तम सोय, स्वच्छता तसेच प्रमुख फादर यांची सहज मिळणारी भेट यामुळे शाळेची गणसंख्या भराभर वाढू लागली.आज ती शाळा मुंबईतील नामांकित शाळा म्हणून गणली जाते. पुढे आम्हीं कल्याण जवळील आंबिवली येथे जाईपर्यंत त्याच शाळेत माझ्या मुली शिकत होत्या. त्यांच्या त्या शाळेतील सुखद आठवणींची आठवण त्या अजूनही काढतात.

पक्ष सभासद झाल्यावर मी भाडेकरू आघाडीच्या शिवाय युवक आघाडी, कामगार आघाडी व लेखक आघाडी अशा स्तरांवर धडाडीने काम करायला लागलो. 'युगांतर' साप्ताहिकात सातत्याने मी लेखन सुरू केले. संपादक श्री. श्रीकांत लाड यांनी मला लेखनाबाबत वेळोवेळी उत्तेजन दिले व मार्गदर्शन केले. पक्षातर्फे दिल्ली येथील बावीस दिवसांच्या अभ्यासक्रमासाठी मुंबईहून मला व श्री. माधव पालकर यांना पाठविण्यात आले. आमच्या शिवाय आमच्या खोलीत गोव्याचे श्री. नारायण पालेकर राहात होते. त्या शैक्षणिक शिबिरात अनेक नामवंत बुद्धिवंतांची अनेक भाषणे झाली. जगातील विविध तत्वज्ञानांची ओळख, सरंजामशाही, लोकशाही व साम्यवाद, जागतिक कामगार चळवळ, भांडवलदारी व साम्यवादी नीतीशास्त्र व अर्थशास्त्र या विषयांची माहिती झाली. ती माझी पहिलीच दिल्ली भेट होती.

माझा कनिष्ठ बंधू राधाकृष्ण एस.एस. सी. पास होऊन गावी बसून होता. रामानंदाने पुढाकार घेऊन त्याला मद्रास येथील एका खाजगी संस्थेत ऑटोमोबाईल इंजीनियरच्या अभ्यासक्रमासाठी पाठवून दिले. त्याच्या मद्रास येथील शिक्षणाचा खर्चाचा बहुतांश वाटा रामानंद उचलीत असे.अधूनमधून मी पण त्याला काही आर्थिक मदत करीत असे. शिक्षणक्रम पूर्ण झाल्यावर राधाकृष्णाने काही काळ कारवार येथील बिणगे या गावाजवळील कॉस्टीकसोडा फॅक्टरी येथे नोकरी धरली. पुढे त्याने उत्तर प्रदेश येथील अनपारा येथे आपले स्वतंत्र असे मोटार दुरुस्तीचे काम सुरू केले. त्या दरम्यान रामानंदराने रेणुकूट येथील आपली

नोकरी सोडून अनपारा येथे स्वतःचा कारखाना काढला. तिथेच त्याने तीन मजली घर बांधून आपल्या कायमच्या निवासस्थानाची सोय केली. त्याच्या कारखान्यात मोठा मुलगा राजेश (राजू) व धाकटा मुलगा गोल्डी (संदीप) हे त्याला मदत करायला लागले.

६७

मी अहमदाबादहून परतताच प्रेमानंदाचे लग्न झाले. कुमठा येथील वैजारी कामत ही वधू होती.लग्नानंतर तिचे नाव लक्ष्मी असे ठेवण्यात आले तरी तिचे व्यवहारनाम गीता असे ठेवले. त्यांना मनोज व संगीता अशी मुले झाली

आमचे चाळ मालक सरदार गुरूबक्षसिंग बरेच दिवस क्षयरोगाने आजारी होते. त्यांनी मटण दुकानात मदत होईल म्हणून दयाराम देवल या माणसाला ठेवून घेतले होते. दयाराम त्यांच्या घरीच राहत होता. तो महाबिलंदर व पाताळयंत्री असा माणूस होता. गुरूबक्षसिंग यांनी लग्न केलेले नव्हते. एक मुलगा असलेल्या त्याच्याव जमातीतील बाईला त्यानी ठेवून घेतले होते. आपल्यानंतर चाळीची मालकी त्या बाईच्या नावावर व्हावी असे मालकाने मृत्यूपत्र केलेले होते. चाळ मालकाचे निधन झाल्यावर साहजिकच सर्व चाळीची मालकी त्या बाईच्या नावावर झाली. ती अशिक्षित असल्यामुळे तिने मुख्यत्यार म्हणून दयाराम याच्या नावावर अधिकारपत्र करून दिले. पुढे दयारामने त्या बाईला आपल्या कह्यात घेऊन तिच्याकडून सर्व मालमत्ता आपल्या नावावर दानपत्र करून घेऊन ताब्यात घेतली. आता ते राजरोसपणे एकत्र राहू लागले. त्यामुळे कंटाळून त्या बाईचा मुलगा पळून पंजाबला निघून गेला.

आमच्या मालकाविरूद्धच्या सगळ्या भाड्याच्या केसेस आता दयाराम लढू लागला 'चाळ मालक संघटने' चा सभासद होऊन त्या संस्थेचा तो अध्यक्ष झाला. त्याने पुढाकार घेऊन काही जणांच्या तक्रारी जमा करून मी वेगवेगळ्या उपक्रमांसाठी विभागातील दुकानदारांकडून जबरदस्तीनी पैसे गोळा करतो अशी तक्रार पोलीस कमिशनर यांच्याकडे नोंदविली त्याचा परिणाम म्हणून मला पोलीस कमिशनर यांच्या कार्यालयातून 'तुम्हाला मुंबईच्या बाहेर तडीपार का करु नये?''अशी विचारणा करणारे पत्र आले. तसेच सात दिवसांच्या आत पोलीस कमिशनर यांच्याकडे तोंडी व लेखी निवेदन सादर करावे असा खास निरोप मिळाला. मी लगेच श्री.सिताराम जगताप श्री. गुलाबराव गणाचार्य यांच्याशी

संपर्क साधला. एक दिवस सर्वश्री जगताप व गणाचार्य यांच्याबरोबर मी पोलीस कमिशनरच्या कार्यालयात हजर झालो. तिथे आम्हाला समाजशाखेच्या प्रमुखांच्याकडे पाठविण्यात आले.आमदार गणाचार्य आलेले पाहताच ते अधिकारी आदराने उभे राहिले. श्री.गणाचार्य यांनी हा सगळा चावटपणा दयारामने केलेला आहे व त्या बाबतची सर्व पार्श्वभूमी सांगितली.त्यामुळे माझ्यावरील सर्व आरोप मागे घेत असल्याचे पत्र मला तिथल्या तिथेच देण्यात आले. ते पत्र घेऊनमी विजयीमुद्रेने दयारामच्या दारावरून घरी आलो. त्या पत्राची झेरॉक्स प्रत काढून लिफाफ्यात बंद करून रात्री त्यांच्या खोलीत टाकून दिली.

६८

एक दिवस सकाळी दरवाजा उघडताच दाराबाहेर टाचण्या लावलेला एक लिंबू ठेवलेला आढळून आला. बायकोने घाबरून मला उठवून तो लिंबू दाखविला. आम्हाला घाबरविण्यासाठी म्हणून दयारामनेच ते काम केले असेल असा अंदाज मी केला. गुपचुप लिंबू उचलून मी तो गटारात फेकून दिला. काही दिवसांच्या अंतराने असाच प्रकार पुन्हा घडला. जमलेले तीन चार लिंबू मी एका पिशवीत गोळा केले. सगळीकडे निजानीज झाल्यावर मी दयारामच्या दरवाज्यात लाईनीत ते लिंबू मांडून ठेवले. दुसऱ्या दिवशी दयारामने बरीच बोंबाबोंब केली. त्यानंतर मात्र पुन्हा कधीही  लिंबू माझ्या दरवाज्यात प्रकट झाले नाहीत.

चाळ कमिटीतील काही सभासद सर्वश्री कुडाळकर, धुरी, परब, चव्हाण, सावंत, कांदळगावकर इ. मिळून भजन मंडळाची स्थापन केली. वर्षभर भजनमंडळाची चांगलीच तयारी झाली व त्यांना कार्यक्रमाची सुपारी मिळू लागली. त्या भजनमंडळाचा मी आश्रयदाता होतो. माझ्या खोलीसमोर लांबलचक असा पण थोडा अरूंद रस्ता होता. तिथे एक दिवस भजनाचा कार्यक्रम घेण्यात आला. भजनाच्या शेवटी 'मराठे शूर के बच्चे' हे पोवाड्याच्या धाटणीचे गीत गाण्यात आले ते गीत आम्ही आपणाला चिडविण्यासाठी मुद्दाम म्हणण्यात आले असा दयारामचा समज झाला. दुसऱ्या दिवशी दुपारी भजनमंडळाला व विशेषत : आमचे चाळकमिटीचे अध्यक्ष श्री. रघुनाथ कुडाळकर यांना भरपूर शिव्या दिल्या असे समजले. आम्ही त्या गोष्टीकडे दुर्लक्ष करून गप्प राहिलो. तीन-चार दिवसांनी कुडाळकर दयारामच्या दरावरून रात्रीला कुठेतरी जायला निघाले दयारामने

त्यांना गाठून तीनचार ठोसे लगावले व पळून गेला. कुडाळकर यांची बोंबाबोंब ऐकून आम्ही तिथे जमा झालो. त्यांना प्राथमिक उपचार केल्यावर खेरवाडी पोलीस स्टेशनवर जाऊन दयाराम यांच्याविरूद्ध तक्रार नोंदविली. त्यावरून दुसऱ्या दिवशी पोलीस स्टेशनमध्ये बोलावून त्याला सक्त ताकीद देण्यात आली. वरील प्रकरण झालेल्या काही दिवसांनी कुडाळकर यांची पत्नी भाजी आणायला निघाल्यावेळी तिलाच ऐकू जातील अशा आवाजात दयारामने घाणेरड्या शिव्या दिल्या. गोष्ट तिने आपल्या नवऱ्याला सांगितल्यावर चाळीतील काहीजण शिगा घेऊन दयारामच्या अंगावर चालू गेले. ते बघितल्यावर आपल्या खोलीतून तलवार हाती घेऊन तो बाहेर पडला व रस्त्यावरून पळायला लागला. त्याचा पाठलाग केला गेला. बेशुद्ध होऊन दयाराम रस्त्यावरून पडल्यावर सर्वजण आपापल्या घरी जाऊन झोपले. मध्यरात्री राऊंडवर निघालेल्या पोलीस गाडीने बेशुद्ध दयारामला दवाखान्यात पोहचविले तो शुद्धीवर आल्यावर दयारामने पोलीसांना दिलेल्या निवेदनात–मी, कुडाळकर, नामदेव धुरी, सावंत मास्तर यांनीच आपणाला लोखंडाच्या शिगांनी मारले असे सांगितले दुसऱ्या दिवशी रात्री आम्हाला स्थानिक पोलीस स्टेशन तर्फे एक निरापे मिळाला,''तुम्हा चार जणांना अटक करणे आम्हाला क्रमप्राप्त आहे. ताबडतोब वकील घेऊन तुम्ही पोलीस स्टेशनला हजर रहा.'' तो निरोप मिळताच आम्ही ताबडतोब श्री बुकटे वकील यांना सांताक्रुज येथील घरी जाऊन भेटलो त्यांच्या सूचनेनुसार दुसऱ्या दिवशी ठीक सकाळी नऊ वाजता आम्ही पोलीस स्टेशनमध्ये हजर झालो. त्यावेळी बुकटे वकील तिथे येऊन पोहचले.

ठीक अकरा वाजता आम्हाला वांद्रा तलावपाळी जवळील कोर्टात हजर करण्यात आले. बुकटे वकील यांनी जामीन अर्ज कोर्टात सादर केला. न्यायाधिशांनी पोलीस इन्सपेक्टरना,''आपला जामीन द्यायला विरोध आहे का?''असे विचारल्यावर ते गप्प राहिले. त्यामुळे आमचा जामीन तात्काळ मंजूर झाला. न्यायालायाने जामीन मंजूर केला तरी आमची ताबडतोब सुटका होणार नव्हती कायदेशीर सर्व सोपस्कार व लायक जामीनदार भेटल्या शिवाय आमची सुटका होणार नव्हती. म्हणून पोलिसांनी आम्हाला व्हॅनमधून सांताक्रूज येथील कारागृहात नेऊन डांबले त्या कारागृहाच्या खिडकीतून समोरील ''लायन पार्कबाग'' दिसत होती. दुपारी डाळभाताचे जेवण देण्यात आले. सायंकाळी

साधारण सात वाजता बुकटे वकील काही कार्यक्रर्त्यांना घेऊन करागृहात आले. सर्व कायदेशीर सोपस्कार केल्या गेल्याची खात्री झाल्यावर आमची सुटका झाली. काही महिने तारखा पडल्यावर आमची केस निर्णयासाठी उभी राहिली तेव्हा बुकटे वकील यांच्या सांगण्यावरून आम्ही निष्णात फौजदारी वकील ॲडव्हॉकेट सिराज निमचवाला यांची नियुक्ती केली. त्यांच्या कौशल्यापूर्ण हाताळणीने आमची निर्दोष सुटका झाली.

खालच्या कोर्टाने आम्हाला निर्दोष सोडले होते. तरी दयारामने उच्च न्यायालयात आमच्या सुटकेच्या विरूद्ध अपील सादर केले. त्याचवेळी पोलीस स्टेशनशी संधान साधून सरकारला पण हायकोर्टात अपील करायला भाग पाडले. वर्षभराने हायकोर्टमध्ये केस उभी राहिली. सरकारी वकील व आमचे वकील (निमचवाला) यांच्यात केसच्या कायदेशीर बाबींबद्दल खल झाला.दोन्ही बाजूंचा युक्तीवाद ऐकून माननीय न्यायाधीशांनी आमच्या निर्दोषपणावर शिक्कामोर्तब केले. या सर्व दिव्यातून बाहेर पडायला आम्ही चार जणांना तीन वर्षाचा कालावधी लागला व साधारण वीस हजार रुपयांचा खर्च झाला.खर्चाची बहुतांश रक्कम आमच्या चाळकमिटी सभासदांनी उचलली होती.अन्य चाळ कमिट्यांमधूनही आम्हाला मदत झाली. तसेच विभागातील काही दुकानदार विशेषत: श्री.शंकर सुवर्णा, श्री.श्रीधर पुजारी, श्री.वासू शेट्टी, श्री.एस.के.शेट्टी (मामा) यांची विशेष मदत झाली.

हायकोर्टमधून आमची निर्दोष सुटका झाल्याची माहिती चाळीत दूरध्वनीवरून कळविली होती. त्यामुळे लेझीम पथक घेऊन सर्व चाळ कमिट्यातील प्रमुख सभासद रेल्वे प्लॅटफॉर्मवर आमची वाट पाहत होते. तिथून आमच्या चाळीपर्यंत गुलाल उधळीत आम्हाला मिरवणूकीने नेण्यात आले. पटांगणात झालेल्या सभेत बुकटे वकील व माझे तडाखेबंद असे भाषण झाले. त्यानंतर दयाराम बराच नरम पडला.

६९

अनपारा येथे राहत असलेला माझा धाकटा भाऊ राधाकृष्ण आता विवाहयोग्य झाला होता. अनपारा येथे वास्तव्यात असताना माझ्या आईचे निधन झाले होते. माझे भाऊजी श्री.रामकृष्ण भट यांच्या पुढाकाराने त्यांच्याच गावातील हळगे येथील प्रफुल्ला शेणवी या मुलीशी राधाकृष्णाचा साखरपुडा

घडवून आला.मी सपत्नीक गावी जाऊन लग्नाचे यजमान पद पार पाडले.रामानंद खास त्या लग्नासाठी अनपारहून आला होता.माझ्या सूचनेवरून वधूचे, 'पद्मा' असे नामकरण करण्यात आले. आईचे सासरचे नाव 'पद्मावती' होते. तिची आठवण म्हणून 'पद्मा' हे नाव मी सुचविले. त्यांना राहूल हा मुलगा झाला.

मुंबईत 'इंडो-अमेरिकन चेंबर ऑफ कॉमर्स' या नावाची संस्था अस्तित्वात आली. श्री रामू पंडित मुख्य कार्यकारी अधिकारी म्हणून तिथे रूजू झाले होते. त्यांनी मला ''बार कौंसिल'' मधून राजीनामा द्यायला लाऊन आपल्याकडे बोलावून घेतले. नव्या नोकरीत दर महा रु. २७५ पगार मिळणार होता. सहा महिन्यांनी तिथे कायम झाल्यावर ३२५ रुपये एवढा पगार झाला.

मे महिन्यात गावी गेल्यावर माझे भाचे अनंत व कृष्णराय (जान्हवीचे मुलगे) यांची मुंज पार पडली. त्याच वर्षी माझी मेहुणी ललिता तिचे लग्न वास्को येथील श्री.नागेश गोपीनाथ नायक यांच्याशी पार पडले त्या लग्नाला मी हजर राहू शकणार नाही म्हणून पत्नी व मुलींना पाठवून दिले होते.लग्न झाल्यानंतर बऱ्याच वर्षांनी अनेक उपचार केल्यावर त्यांना प्रसाद व पल्लवी ही दोन मुले झाली.

चेंबरमध्ये मी टायपिस्ट म्हणून नोकरीला लागलो होतो. पुढाकार घेऊन मी अंगावर पडेल ते काम जिद्दीने व निष्ठेने पार पाडीत होतो. त्यामुळे हिशेब लिहिण्याशिवाय चेंबरमधील कामाचा सर्वकश असा अनुभव आला त्या अनुभवाचा चेंबरला पण अतोनात फायदा झाला. काही वर्षाच्या अंतराने मला पदोन्नती मिळत गेली. टायपिस्टपासून सिनियर क्लार्क, डेव्हलेपमेंट ऑफिसर, ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर, प्रेस रिलेशन्स ऑफिसर व शेवटी कनसल्टंट (सल्लागार) म्हणून एकेक वरची पायरी चढत गेलो.

अजूनपर्यंत मी संयुक्त महाराष्ट्र समिती व डाव्या पक्षांचे संघटन यांच्यातर्फे उभ्या राहिलेल्या उमेद्वारांच्या निवडणूक प्रचारात सक्रिय व जोरदार असा सहभाग घेतला होता.निवडणुकींचा माझा अनुभव साधारण वीस वर्षाचा होता त्यामुळे मुंबईमहानगरपालिकेच्या निवडणुकीत पक्षाने मला उभे केले. देशात त्या वेळी जनतादलाची जबरदस्त लाट होती.त्यामुळे माझे प्रतिस्पर्धी समाजवादी पक्षाचे श्री.दत्ता नरे हे निवडून आले.माझा ८०० मतांनी पराभव झाला.त्या निवडणुकीच्या प्रचाराच्या वेळी प्रमुख कार्यकर्त्यांनी हिरीरीने भाग घेतला नाही.

अनेक खोटी कारणे सांगून त्यानी आपले अंग काढून घेतले.त्यातच चाळ कमिटीतील माझे एक विश्वासू साथीदार गुप्तपणे शिवसेनेच्या उमेद्वाराचे काम करत होते. ती गोष्ट साधारणपणे वर्षभराने खात्रीलायक सूत्रांमुळे मला मिळाली.मी निष्ठेने व त्यागपूर्वक कामे केलेली असताना सुद्धा सहकार्यांनी मला योग्य साथ दिली नाही त्याबद्दल मी फारच खट्टू झालो. त्यातच भाड्याबाबतची केस बरीच वर्षे चालत असली तरी निर्णय जवळ दिसून येत नव्हता.त्यामुळे कंटाळलेल्या काही भाडेकरूंना दयारामने आपल्या जाळ्यात खेचले.आम्ही घेतलेले निर्णय त्याला तात्काळ समजायला लागले. महाराष्ट्र विधानसभेच्या निवडणुकीत भारतीय जनता पार्टीचे श्री.रामदास नायक आमदार म्हणून निवडून आले. अनेक पक्ष फिरून आलेल्या दयारामने रामदास नायक यांची कास्टी पकडली व त्या पक्षाचा तो सभासद झाला.''सरशी तिकडे पारशी.''या न्यायाने दयाराम जिकडे-तिकडे बेडूक उड्या मारत असे. त्याने आमदार नायक यांना मध्यस्थीला घालून चाळ कमिटीबरोबरची कायदेशीर सर्व भांडणे मिटवून घेतली.त्या बदल्यात ''फक्त एक हजार रुपये घेऊन ज्यांना खोली कायमची सोडून जायची असेल तर त्यांनी आणलेल्या माणसांच्या नावावर भाडे पावती फिरवून देऊ.'' असे लेखी आश्वासन दिले.

आमच्या चाळीजवळ अंकोला येथील श्री. शिवानंद शेट्टी व त्याचे कुटुंब राहत होते. श्रीमती सुमित्रा शेट्टी व माझी पत्नी वर्गमैत्रीणी होत्या. त्या दोघींचे वडील गावी(अंकोल्यात) वर्गमित्र होते. शेट्टीची मुलगी रजनी (रज्जू) व माझी धाकटी मुलगी नंदिनी ह्या तिसऱ्या पिढीतील वर्गमैत्रीणी होत्या. तीन पिढ्यांतील लोक एकमेकांचे सहाध्यायी असणे हा एक अपूर्व असा योगायोग होता. शेट्टी व आमच्या कुटुंबात घनिष्ठ घरोबा होता. श्री. शेट्टी हे ''माझागाव डॉक्स'' मध्ये कामाला होते. त्यांचा एक सहकारी श्री. कृपाशंकर जोशी हे कल्याण पुढील आंबिवली येथे रहायला होते. त्यांच्या आग्रहावरून शेट्टी कुटुंब आंबिवली येथे स्थलांतरीत झाले. जाण्यापूर्वी त्यांनी आपला तिथला पत्ता देऊन दोन दिवस राहायला येण्याचे अगत्याचे आमंत्रण आम्हाला दिले होते.

प्रेमानंदाचा भाऊ अशोक हा मुंबईला येऊन अनेक ठिकाणी नोकऱ्या करीत राहिला. त्याने फुलोमिना तेंडूलकर या मुलीशी आंतरधर्मीय विवाह केला. लग्नानंतर तो सांताक्रूज पाईप लाईन येथील एका चाळीत रहायला गेला. त्याला अमित व नीता(पिंकी) अशी दोन मुले झाली.

## जांबावली ते आंबीवली

### ७०

मे महिन्याच्याशेवटी आम्ही शेट्टी यांच्याकडे दोन दिवस राहायला म्हणून निघालो. ठाणे खाडीवरील पुलावरून गाडी पुढे जाताच हवेचा गारवा जाणवू लागला मुंबई व ठाण्यापुढील वातावरणात अतिशय सुखकारक बदल आहे याची मी नोंद घेतली रेल्वे फलाटावर उतरताच लांबलचक अशा मोठ्या दगडावर 'आम्बीवली' ही मोठी अक्षरे पाहताच मला एकदम आमचे कुलदैवत (दामोदर) असलेले 'जांबावली' या गावाच्या नावाची आठवण झाली. गोव्यातील बाटाबाटीच्या काळात आमचे पूर्वज -धर्म, संस्कृती व कुळाचार यांचे रक्षण करण्यासाठी म्हणून तिथून पळून आदिलशाहीच्या ताब्यात असलेल्या कारवार प्रदेशात आल्याची आठवण झाली. त्या पिढीतील एक वंशज या नात्याने मी यापुढील जीवनात आम्बीवली येथे राहणार हे नक्की झाले. 'जांबावली ते आम्बीवली' या नावाची जोडगोळी माझ्या मनात पक्की रूजली. या पुस्तकाला तेच नाव देण्याचा विचार माझ्या मनात पक्का झाला श्री शेट्टी यांचे प्रशस्त घर, आत संडास व चोवीस तास पाणी बघून आम्हीपण तिथेच जागा घ्यावी असा बायकोने विचार केला. मलापण तो विचार पटला संध्याकाळी आम्ही सर्वजण विभागात फिरायला गेल्यावर आंबटकरचाळीत चार सेल्फ कंटेड खोल्यांची इमारत पाहून बिल्डिंगच्या टेरेसवर गेल्यावेळी तिथे मालकाचा मुलगा संजय भेटला. आजूबाजूला भरपूर झाडी व दोन नद्यांच्या संगमात असलेली जागा पाहून, मी ती जागा घेण्याचे नक्की केले

शेट्टी व संजय यांची ओळख होती. चार हजार रुपये डिपॉजिट व साठ रु. मासिक भाडे या तत्त्वावर जागा द्यायची आहे असे समजले. संजयला ''नंतर कळवितो'' असे सांगून आम्ही शेट्टीच्या घरी परतलो. शेट्टी यांना रजनी, विद्या, गोपाळ, विनय अशी चार शाळेत जाणारी मुले होती. त्यांनी आपल्या मुलांची शिक्षणाची सोय कुठे केलेली आहे असा प्रश्न केला. ते सर्वजण कल्याण येथील 'न्यु लुडस स्कुल' येथे जाणार असे समजले त्यांना तिथे कोणत्याही अडचणी शिवाय प्रवेश मिळाला होता. दुसऱ्या दिवशी शाळेच्या प्रिन्सिपॉलना भेटल्यावर त्यांनी माझ्या मुलींना तेथे प्रवेश देण्याचे मान्य केले मुलींच्या शाळेचा प्रश्न सुटणार असल्याचे पाहून मी आंबटकर यांना त्यांची खोली भाड्याने घेत असल्याचा निरोप धाडला, तात्काळ इमारतीचे मालक श्री हरीश्चद्र आबटकर हे

येऊन भेटले. आठ दिवसांच्या आत दोन हजार रुपये ॲडव्हान्स देणे व राहिलेली रक्कम घरात प्रवेश करताना देणे या तत्त्वावर घर घेण्याचे ठरले. चार दिवसांनी आम्बिवली येथे चक्कर टाकून मी दोन हजार रुपये मालकांना दिले. दयाराम बरोबर चाळकमिटीचा समेट झाल्यापासून अनेक भाडेकरू आपल्या खोल्या भराभर नातेवाईकांना देऊन दूर उपनगरात जाऊ लागले. आमचे एक निष्ठावंत कार्यकर्ते, श्री. यशवंत तावडे हे जागेअभावी आमच्या पक्ष कार्यालयात झोपत असत. त्यांना मी सुलभ हप्त्यावर माझी खोली देऊन; आम्ही अम्बिवली येथे येऊन स्थाईक झालो.

पद्मिनी व नंदिनीची शाळा सुरळीतपणे सुरू झाली. दोघीही एस. एस. एल. सी. पास झाल्यावर कल्याण नगरातील 'बिर्ला कॉलेज' येथे त्यांनी प्रवेश घेतला. त्या दोघीही पदवीधर होऊन बाहेर पडल्या. अशा प्रकारे त्यांचे शिक्षणपर्व पार पडले. त्यांनी पुढे शिकावे, डबल ग्रॅज्युएट व्हावे असे मी सुचविले. दोघींनीही ''आणखी शिकायचे नाही.'' असे निक्षून सांगितले. त्यानंतर अनेक ठिकाणी त्यांनी नोकऱ्या केल्या.

७१

१९८७ साली आमच्या लग्नाला २५ वर्षे पूर्ण झाली. त्यानिमित्त विशेष प्रमाणात विवाहाची रजतजयंती साजरी करण्याचे आम्ही ठरविले. डिसेंबर महिन्यातील पाच रविवार व २५ डिसेंबरची ख्रिसमसची रजा धरून एकूण सहा दिवस, वीस ते पंचवीस जणांचा गट करून घरी दुपारच्या जेवणासाठी आमंत्रित करण्याचे ठरविले. त्याप्रमाणे माझे नातेवाईक, पत्नीचे नातेवाईक, कडवाड-सुंकेरी येथील सलगीची माणसे, माझ्या कार्यालयातील सहकारी व त्यांचे कुटुंबिय मुलींच्या मित्रमैत्रिणी व आसपासचे ओळखीचे लोक असे गट पाडून उत्तमरितीने सहा दिवस कार्यक्रम पार पाडले. त्योवळी होनीला (प्रेमानंदाची आई) आमच्याकडे महिनाभर ठेऊन घेतले होते. स्टुडियोतून कॅमेरामनला बोलावून प्रत्येक गटाचे फोटो काढून घेतले व त्याच्या प्रती संबंधितांना भेट म्हणून पाठवून दिल्या.

पद्मिनी व नंदिनी यांच्या साधारण तीन वर्षे नोकऱ्या झाल्या होत्या. त्या आता विवाहयोग्य झाल्या म्हणून मी वरसंशोधनाला सुरुवात केरावी असे विचार मनात घोळू लागे. मी दोघींना वेगेवेगळे घेऊन, , ''त्यांचे कुठे जमलेले नाही ना ?'' असे विचारले. त्यांनी 'नाही' म्हणून सांगितल्यावर पुढील

कार्यवाहीसाठी सज्ज झालो. नोकरी करून वरसंशोधन करणे हे एक जिकीरीचे काम होते. त्यासाठी मी फक्त रविवारच देऊ शकत होतो. एक एक स्थळ पाहून त्याची तड लागेपर्यंत साधारण महिना निघून जायचा. मी मुंबईला आल्यावर आमचा समाज एकीकडे जोगेश्वरीपर्यंत व दुसरीकडे ठाण्यापर्यंतच पसरलेला होता. आता समाज पार विरारपर्यंत व मध्यरेल्वेवर अंबरनाथ पर्यंत पसरलेला होता. सतत नोकऱ्यांमुळे माझा समाजाशी जवळचा संबंध राहिलेला नव्हता. त्यामुळे विवाहयोग्य मुले कुठे आहेत याची माहिती काढण्यातच बराचसा वेळ वाया जाऊ लागला.

चेंबरमध्ये ५८ व्या वर्षी निवृत्ती ठरलेली होती. कंपनी व कर्मचारी या दोघांना गरज भासल्यास आणखी दोन वर्षे नोकरी करण्याची मुभा मिळायची . आग्रह होत असतानाही मी निग्रहपूर्वक मुदतवाढ न घेता ५८ व्या वर्षीच निवृत्त होण्याचे ठरविले. मी अनेक जणांना नोकऱ्या मिळवून दिल्या. त्यांची व त्यांच्या नातेवाईकांची लग्ने ठरवून दिली होती. तरी माझ्या मुलींच्या लग्नाच्या वेळी मी उपकृत केलेल्या लोकांडून वरसंशोधनात हवे तसे सहकार्य लाभत नव्हते.

ठरल्याप्रमाणे मी ३१ डिसेंबर १९९० रोजी सेवानिवृत्त झालो. त्यावेळी कार्यालयातर्फे निरोपाची जंगी पार्टी देण्यात आली. चेंबरचे त्यावेळचे अध्यक्ष बॅरिस्टर अशोक प्रताप यांनी माझे व माझ्या कार्याची प्रशंसा करणारे दीर्घ भाषण केले. मला व माझ्या पत्नीला त्यावेळी नाना तऱ्हेच्या भेटी देण्यात आल्या. निरोप समारंभ आटोपून मी घरी जायच्या तयारीत असताना बॅरिस्टर प्रताप व श्री. रंगराज यांनी मला बोलावून घेतले. पुढील किमान तीन वर्षे तरी आठवड्यात तीन दिवस सल्लागार म्हणून काम करावे अशी गळ घातली. त्याबद्दल मला महिना दोन हजार रुपये मानधन मिळणार होते चेंबरशी असलेले दीर्घ नातेसंबंध चालू राहतील व दरमहा ठराविक रक्कम खर्चाला मिळेल या उद्देशानी तो प्रस्ताव मी स्वीकारला.

७२

ठाणे पूर्व येथे श्री. सुरेश राज्याध्यक्ष राहात असत ते आधी छंद म्हणून व नंतर व्यवसाय म्हणून आमच्या समाजातील मुलामुलींची लग्ने जुळवून देत असत. विशेषत: ठाणे व मुलुंड येथील बऱ्याच जणांनी माझ्या मुलींची लग्ने जुळविण्यास श्री. राजाध्याक्ष यांची मदत घ्यावी असे सुचविले

राजाध्यक्ष हे मूळचे गोव्याचे. फोर्टमधील 'फोर्नस व फोर्बस' या कंपनीत चांगल्या हुद्द्यावर कामावर होते. त्यांची बायको एका राष्ट्रीय बँकेत उच्चपदावर काम करीत होती. त्यांना मूल-बाळ नव्हते. छंद म्हणून लग्न जुळवण्याचे काम राजाध्यक्षांनी सुरू केले. पुढे राजाध्याक्षांनी स्वेच्छा निवृत्ती घेतल्यावर आपल्या छंदाचे रूपांतर व्यवसायात केले. त्यांच्यातर्फे पद्मिनीचे लग्न 'श्री आनंद पुंडलिक गायतोंडे या मुलाशी जमले. ६ जुलै १९९२ या दिवशी त्यांचे लग्न ठाण्यातील शुभमंगल कार्यालयात थाटात पार पडले.

पद्मिनीचे लग्न पार पडल्यावर काही महिन्यांतच नंदिनीची पत्रिका श्री.राजाध्यक्ष यांच्याकडे दिली. ठाणे कापूरबावडी येथे राहाणारे श्री.अवधूत नरेंद्र पै यांच्याशी तिची सोयरीक जुळली व ८ नोव्हेंबर १९९२ रोजी शुभमंगल कार्यालयात त्यांचे लग्न पार पडले.पद्मिनीला आबोली व नंदिनीला अनीशा अशा मुली आहेत.

माझा ६१ वा वाढदिवस साजरा करावा असे ठरले. डोंबिवली येथील 'मोरया प्रकाशनांचे मालक श्री. दिलीप महाजन यांनी ''भारतीय नवरत्ने'' माझे २१ वे पुस्तक नुकतेच छापून पूर्ण केले होते. पुस्तकाचे प्रकाशन व माझी एकसष्ठी असा योग साधून ठाणे येथील हॉलमध्ये तो समारंभ साजरा केला. सायंकाळी चार वाजता कार्यक्रम होणार होता व इच्छा भोजनाची सोय केली होती. त्या कार्यक्रमाला साधारण ८० जण हजर होते.

श्री. प्रभाकर संत (माजी आमदार व कल्याणमधील 'सरस्वती पुस्तक भांडारांचे मालक) प्रमुख पाहुणे म्हणून हजर होते. ग्रंथप्रसारक श्री. शरद जोशी हे सभेच्या अध्यक्षस्थानी होते. सर्वश्री सीताराम जगताप (मुंबई महानगरपालिकेचे माजी नगर सेवक), श्री. पांडुरंग कुमठा (बॉम्बे बुक डेपोचे मालक), आंतरराष्ट्रीय सल्लागार श्री. अरविंद चोटाई, मोरया प्रकाशनाचे मालक श्री. दिलीप महाजन, सोलापूरहून खास आलेले तिथले दैनिक 'गस्त'चे उपसंपादक पी. पी. गायकवाड पाटील इत्यादींची समोयचित अशी भाषणे झाली. त्या कार्यक्रमाचा वृत्तांत मुंबई येथील सर्व दैनिकांतून छापून आला. माझे अनेक मित्र व चाहत्यांनी महाराष्ट्रच्या निरनिराळ्या दैनिकांमध्ये माझ्याविषयी लेख व फोटो प्रकाशित केले. त्या कार्यक्रमाच्या वेळी बायकोने सुवासिनींची खणा-नारळाने ओटी भरली. त्यावेळी मला अनेक शाली व अन्य भेटी मिंळाल्या. बायकोला बऱ्याच साड्या मिळाल्या.

माझी नात अनीशा त्यावेळी अडीच वर्षांची होती. तिने मला ६१ रुपयांच्या नोटांचा हार घातला तेव्हा टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला.

७३

आमच्या कुटुंबातील सर्व जण मुंबई व अन्य ठिकाणी नोकरी धंद्यासाठी स्थिरावले आहेत त्यामुळे गावातील आमच्या घराण्यातील इष्टदेव श्री मारुतीची पूजा रखडण्याचा प्रश्न उभा राहिला. तिथे रोज अन्नाचा नैवेद्य अर्पण करण्याची प्रथा होती. कुणातरी स्थानिक माणसाला पगारी पुजारी म्हणून नेमावे असे ठरले. त्यासाठी निधी उभारण्यासाठी ''कडवाड मारुती ट्रस्ट'' या नावाच्या न्यास उभा केला. कुटुंबातील प्रत्येक कमवत्या माणसाने किमान दरमहा अमूक एवढी रक्कम त्या न्यासात जमा करावी असा ठराव सर्व संमतीने पास झाला. साधारण ४० वर्षांपूर्वी सुरूवातीचे आठ हजार रुपये त्या फंडमध्ये घालून सुरू केलेल्या न्यासात सध्या दोन लाख रुपये जमा झालेले आहेत.आमच्या गावातील श्री.गोपाल प्रभू हे आमच्या मंदिरातील पूजा व घराची व्यवस्था उत्तमरितीने पाहात आहेत त्यासाठी त्यांना दरमहा ठराविक रकमेच्या मानधनाची व्यवस्था केली आहे फंडामधील जमलेल्या पैशाच्या व्याजातून मानधनाची व्यवस्था केली जाते

माझ्या जन्माच्याअगोदर (७० वर्षांपूर्वी) वडिलांनी मंदिराचा जिर्णोद्धार केला होता.त्याची डागडुजी व नूतनीकरण करण्याची आवश्यकता होती त्यासाठी साधारण ३० हजार रुपयांचा खर्च येणार होता न्यासात मूळ जमा असलेल्या भांडवलाला हात न लावता सर्वांनी वर्गणी काढून ती रक्कम पूर्ण करावी तसेच पावतीपुस्तक छापून मित्र व नातेवाईकाकडून निधी गोळा करावा असा निर्णय घेण्यात आला आवश्यक निधी जमा झाल्यावर माझे चुलत बंधू श्री अनत नारायण भट (दादा) यांनी मंदिराचे डागडुजीचे काम व्यवस्थितपणे करवून घेतले

गेल्या साधारण वीस वर्षापासून आमच्या पिढीतील अनेक जण निवृत्त होत चालले माझ्या वडिलांनी मंदिराचा जिर्णोद्धार उत्तम रीतीने केला होता तरी आर्थिक अडचणी मुळे त्याना कलश घालणे जमले नव्हते मंदिरावर कळस चढविल्याशिवाय ते पूर्ण होत नाही असे धर्मशास्त्रात सांगितलेले आहे आमच्या ट्रस्टच्या नियमानुसार वर्षातून चार सभा घेणे आवश्यक होते एका सभेत कलश घालण्याचा विषय निघाला त्यासाठी प्रचंड खर्च होणार याची कल्पना आली मंदिराची डागडुजी १०वर्षापूर्वी केली होती तरी मूर्ती असलेल्या गर्भगृहात

दुरूस्ती केलेली नव्हती. त्या खोलीत संगमरवरी लाद्या (अमृतशिला) बसवून घ्यावे असे ठरले. पाच वर्षापूर्वी मंदिराच्या गर्भगृहाची पुनर्रचना, कलशधारणा समारंभ मोठ्या प्रमाणात करावा असे ठरले. त्या कार्यक्रमासाठी आमच्या कुटुंबातील जास्तीत जास्त मंडळी सामिल झाली होती. अनेक वर्षांनी कुटुंबातील बरीच मंडळी कडवाडला एकत्र राहिली. त्यासाठी आवश्यक कर्मचारी वर्ग व स्वयंपाकी यांची नेमणूक केली होती. कलश स्थापना झालेल्या दिवशी मोठ्या प्रमाणात गावजेवण देण्यात आले. त्या एकूण समारंभाची तयारी करण्यासाठी प्रेमानंद, त्याची आई मी व माझी पत्नी कडवाडला महिनाभर मुक्काम ठोकून होतो.

७४

दरम्यान माझे पुतणे राजू व गोल्डी (संदीप) त्यांची लग्ने पार पडली. यल्लापूर येथील कु. रूपाली मुरलीधर प्रभू हिचे लग्न राजूशी मुंबई, वडाळा येथील 'द्वारकानाथ भुवन' येथे पार पडले. ते लग्न झाल्यावर वरात अनपाऱ्याला निघाल्यावेळी मी व माझी पत्नी त्यांच्याकडे रहायला उत्तरप्रदेशला गेलो. तिथे असताना रेणुकूट, मिर्जापूर येथील आसपासची प्रेक्षणीय व धार्मिक स्थळे तसेच प्रयाग (अलाहाबाद) येथील त्रिवेणी संगम, बनारस येथील विश्वेश्वर मंदिर, बनारस हिंदू विश्वविद्यालय, तेथील प्रसिद्ध बिर्ला मंदिर इत्यादी स्थळे पाहून घेतली. राजूचे लग्न पार पडलेल्या तीन वर्षांनी गोल्डी याचे लग्न मध्य प्रदेशातील कोरबा गावातील कु. जयश्री व्यंकटेश नाईक यांच्याशी पार पडले. त्या लग्नाला मी व पत्नी आवर्जून हजर होतो. राजू याला –नम्रता, नमन व गोल्डी याला–संजना, सजल अशी मुले आहेत. गोल्डीचे लग्न पार पडलेल्या पूर्वीच्या वर्षी प्रेमानंदाचा मुलगा मनोज याचा विवाह त्याची मामेबहिण कु. शीतल श्रीधर कामत हिच्याशी 'कुमठा' येथे संपन्न झाला. काही वर्षापासून मनोज हा कुवेतची राजधानी दोहा येथे नोकरीला आहे. त्याला अनंत (पवन) व सिमरन (आर्या) ही मुले आहेत.

साधारण आठ वर्षापूर्वी एक दिवस बायकोला श्वास घेताना धाप लागायला लागली. काही दिवस स्थानिक उपचार करून पाहिले पण समाधानकारक असा प्रतिसाद लाभला नाही. म्हणून तिला डोंबिवली पूर्व येथील ''कस्तुरी प्लाझा'' या इमारतीत असलेल्या ''धन्वंतरी हॉस्पिटल''मध्ये दाखल केले. डॉ. व्हि एस. खटकुल हे बेळगावकडचे होते. त्यांच्याकडे काम करणारी वसुमती ही नर्स आमच्या चेंबरमध्ये काम करणाऱ्या कोमलवल्ली हिची मुलगी. तिच्या

ओळखीमुळे मी बायकोला त्या हॉस्पिटलमध्ये नेले होते. तिथे तिला चांगली ट्रीटमेंट मिळाली. नऊ दिवसांच्या वास्तव्यानंतर बायकोला घरी पाठविण्यात आले. तिला पाठवायच्या आगोदर डॉक्टरने मला एकट्यालाच आपल्या कॅबिनमध्ये बोलावून घेतले. 'तुमच्या बायकोच्या हृदयाच्या डाव्या बाजूची वॉल्व्ह खराब झालेली आहे. मी लिहून देतो त्या गोळ्या त्यांनी वेळच्यावेळी घेणे आवश्यक आहे. तसेच त्यांनी आपले वजन घटवणे व जेवणाबाबत मी सांगितलेली पथ्ये पाळणे आवश्यक आहे.'' असे सांगितले.

दिवसभरात सकाळसंध्याकाळ मिळून बायकोला एकूण तेरा गोळ्या घेणे आवश्यक होते. त्याशिवाय अकस्मात कधी धाप लागल्यास जिभेखाली ठेवण्यासाठी म्हणून विशेष अशी गोळी पण दिलेली होती. साधारण दोन वर्षे सातत्याने गोळ्या घेतल्यावर बायकोला कंटाळा यायला लागला व ती गोळ्या घेण्याचे टाळायला लागली. ते माझ्या लक्षात आल्यावर रोज मी तिला गोळ्या देण्याचे काम पत्करले. पुढे एकदा मी बायकोला डॉ. खटकुल यांच्याकडे नेऊन तिच्या प्रकृतीची तपासणी करून घेतली. त्यावेळी त्यांनी पूर्वी दिलेल्या गोळ्यांत कपात करून नवीन काही गोळ्या दिल्या आता दिवसभरातून घ्यायच्या गोळ्या नऊवर आणण्यात आल्या.''तुमच्या पत्नीच्या हृदयाचे आता दुसरे वॉल्व्हपण निकामी होत चालले आहे त्यामुळे आणखी तीन–चार बर्षाच्यापेक्षा त्यांची गॅरंटी देता येणार नाही. त्यांना काही त्रास व्हायला लागल्यास ताबडतोब माझ्या हॉस्पिटलमध्ये आणा त्यातल्या त्यात एक गोष्ट बरी आहे की पेशन्टला वेदनामय अशी बिमारी नाही.'' असे डॉ. खटकूल यांनी सांगितले.

मंदिराची कलश स्थापना झालेल्या दिवसाची आठवण म्हणून दर वर्षी वर्धापनदिन साजरा करावा असे ठरविले त्यानुसार आमच्या कुटुबातील बरेच जण गावी जाऊन प्रथम वर्धापनदिन साजरा केला त्या उत्सवाला मी सपत्निक गावी गेलो होतो. त्यावेळी साधारण महिनाभर आम्ही कारवार, अंकोला व गोवे येथील सर्व नातेवाईक व मित्रांच्याकडे जाऊन आलो. गावाहून परततानाच बायकोची तब्येत नरम झाली. घरी पोहचताच मी डॉ खटकुल याच्याशी संपर्क साधला त्यांनी काही गोळ्यांचा फरक करून काही नवीन गोळ्या लिहून दिल्या साधारण सहा महिन्याचा काळ निघाल्यावर बायकोच्या तोंडावर सूज दिसायला लागली व तिच्या लघवीचे प्रमाणपण कमी झाले पूर्वीसारखे नी जेवणखाण घेत

नव्हती व द्रवपदार्थ घेण्याचे प्रमाणपण कमी झाले म्हणून मी तिला ताबडतोब धन्वंतरी हॉस्पिटलमध्ये दाखल केले

साडेपाच वर्षांच्यापूर्वी बायकोचे निदान करून ट्रिटमेंट दिल्याची फाईल मी जूपन ठेवली होती. त्यामुळे डॉक्टरांना तिच्या आजाराची झटपट कल्पना आली. दिवसभराच्या तपासणीनंतर बायकोच्या यकृताला व आतड्याला सूज आली होती असे समजले. ''केस कठीण आहे. पण मी प्रयत्न करून पहातो.'' असे डॉक्टर म्हणाले.''उपचारासाठी तुम्हाला योग्य वाटेल ते सर्वकाही करा व खर्चाकडे लक्ष देऊ नका.''असे मी डॉक्टरांना सांगितले. तिसऱ्या दिवशी डॉक्टरांनी आम्हाला बाजूला घेऊन,''आता ती काही काळाचीच सोबती आहे. तुम्ही तुमच्या मनाची तयारी करून ठेवा व नातेवाईकांना कळवायचे असेल तर कळवा.'' असे त्यांनी स्पष्टपणे सांगितले. त्यांनुसार मी माझ्या भावंडांना व बायकोच्या भावंडांना रात्री फोन करून माहिती दिली.

दिवसभर दवाखान्यात मी व पद्मिनी राहत होतो. रात्री झोपायला माझे धाकटे जावई श्री.अवधूत पै हे हॉस्पिटलमध्ये सोबत म्हणून झोपायला होते.हॉस्पिटलमध्ये दाखल झालेल्या चौथ्या दिवशी सकाळी ४ वाजता माझ्या बायकोची प्राणज्योत मालवली. (१४ ऑगस्ट २००३) बातमी समजताच मी आणि पद्मिनी तातडीने हॉस्पिटलमध्ये पोहचलो. त्यावेळी सोबत म्हणून तिच्या सोसायटीतील काही पुरुषमंडळीपण आमच्या सोबत आली. तातडीने मुंबई व डोंबिवली येथील नातेवाईक व खास मित्रांना फोन करून कळविले. त्यानुसार साधारण दहा वाजता.(सकाळी) स्मशानात विधियुक्त अंत्यसंस्काराचे कार्य पार पाडले. मला जास्त वेळ बसायला होत नाही म्हणून माझे पुतणे प्रेमानंद याने अग्नीसंस्काराचे धार्मिक विधी पार पडले. दुसऱ्या दिवशी थोरले जावई आनंद गायतोंड हे हैदाबादहून येऊन पोहोचले. ते आल्यावर दोन्ही जावयांनी भटजींनी सांगितल्याप्रमाणे अस्थी गोळा करून वाळकेश्वर येथील बाणगंगेत नेऊन त्यांचे विसर्जन केले. पुढील दहा ते तेरा दिवसांचे कार्य पार पाडण्यासाठी म्हणून माझा कनिष्ठ बंधु राधाकृष्ण उत्तर प्रदेशाहून आला.त्याने सर्वविधी यथासांग पार पाडले. प्रथमवर्ष श्राद्धाला पण राधाकृष्ण आला होता. माझ्या सांगण्यावरून राधाकृष्णाने गया येथे जाऊन विष्णूपदावर बायकोचे श्राद्ध केले व धार्मिक विश्वासानुसार पत्नीच्या आत्म्याला कायमची मुक्ती संपादित करून दिली.

## ७५

पत्नीच्या निधनानंतर माझी दिनचर्या व कार्यक्रम यात बराच बदल झाला. मी आळीपाळीने थोरली मुलगी पद्मिनी (कल्याण) व धाकटी मुलगी नंदिनी (टिटवाळा) येथे राहतो. तसेच आम्बीवली येथे असताना मी माझ्या लेखनाचे काम व पत्रव्यवहार पार पाडतो. बायकोचे वर्षश्राद्ध पार पडल्यावर मी गावी रथोत्सव व कलश स्थापना वर्धापन दिनास जाऊन आलो. पुढील वर्षी मे महिन्यात दोन्ही मुली व दोन्ही नाती(अनीशा,अबोली) यांना घेऊन तीन आठवड्यासाठी गावी जाऊन आलो. त्यांना आमचे ठिकठिकाणच्या नातेवाईकांची ओळख करून दिली. सर्वांकडे काही दिवस राहून परस्परांचे प्रेम व नाते वाढविले. उत्तरप्रदेश येथे राहणारे माझे बंधू रामानंद काही कामासाठी म्हणून पुण्याला आले होते. त्याच्या आग्रहावरून त्याच्यासोबत मी अनपारा येथे गेलो. एकूण अडीच महिने तिथे राहिलो. रामानंद व त्याचे दोन मुलगे-राजू व गोल्डी तसेच कनिष्ठ बंधू राधाकृष्ण यांच्या घरी आलटून पालटून राहत होतो. परतीच्या प्रवासासाठी गोल्डी सोबतीला आला होता

साधारण बारा वर्षांपूर्वी गोल्डीला तांत्रिक शिक्षणासाठी आमच्याकडे ठेवले होते. पावणेतीन वर्षाच्या काळात त्याने अनेक कोर्स केले. त्यानंतर तो आपल्या वडिलांना कारखान्याच्या कामात मदत करण्यासाठी म्हणून अनपारा येथे निघून गेला.

माझे अनेकानेक वाचक गेल्या काही वर्षापासून मी आत्मचरित्र लिहावे असा सततचा आग्रह करीत आहेत. माझी आजपर्यंत सत्तावीस मराठी व अठ्ठावीस इंग्रजी पुस्तके प्रकाशित झाली आहेत त्यामुळे संपूर्ण महाराष्ट्र, गोवा, बेळगाव, इत्यादी ठिकाणाहून माझी पुस्तके वितरित झालेली आहेत. गेल्या तीस वर्षाच्या माझ्या साहित्यिक कारकीर्दीत साधारण चारशे पत्रे वाचकांकडून मला आलेली आहेत. त्यातील काही पत्रे टीकात्मक अशी पण होती. रास्त टीकेची दखल घेऊन मी वेळोवेळी माझ्या लिखाणात बदल केले. आजच्या घडीला एका अंदाजानुसार माझी वाचकसंख्या तीन लाखांच्यावर आहे

वाचकांनी आत्मचरित्र लिहिण्यासाठी केलेल्या विनंतीवर बऱ्याच दिवसांपासून विचार करीत होतो. विस्तारपूर्ण आत्मचरित्र लिहिल्यास ५०० पेक्षा जास्त पानांचे पुस्तक होईल म्हणून ते चार विभागात लिहावे असे ठरविले

एकूण तेरा ठिकाणी मी पूर्णवेळ व अन्य काही ठिकाणी अर्धवेळ नोकऱ्या केल्या होत्या. तसेच काही व्यवसाय पण केले होते. त्या सर्वांचा अनुभव ग्रंथित करून ''नोकरनामा'' नावाचा पहिला खंड प्रकाशित करावा असे ठरविले. अनपारा येथे असताना मला भरपूर रिकामा वेळ असायचा. त्यामुळे ''नौकरनामा'' या पुस्तकाचा कच्चा आराखडा मी तिथल्या वास्तव्यात पूर्ण केला आम्बिवली येथे परतल्यावर मी त्या कच्च्या आराखड्यावरून सविस्तर पहिल्या खंडाची (नोकरनामा) मुद्रणप्रत तयार केली. त्या पुस्तकात छापण्यासाठी म्हणून माझ्या व्यावसायिक जीवनतील महत्त्वाचे क्षण टिपणारे १४ फोटोग्राफ निवडून ठेवलेव मी गावी निघून गेलो.

गावी निघून जाण्याचे कारण म्हणजे मी अनपारा येथे असताना राधाकृष्णाचा मुलगा राहूल याची मुंज करण्याबाबत विचार विनिमय झाला होता, तिकडेच जर मुंज केली तर आमचे गोवा, कारवार, मुंबई येथील नातेवाईक पोहोचणे कठीण झाले असते. म्हणून राहुलची मुंज आमचे मूळ गाव कडवाड येथील वडिलोपार्जित घरी करण्याचे ठरले. त्या घरात आमच्या अनेक पिढ्या नांदल्या होत्या. तसेच बाजूला आमचा इष्टदेवश्री मारूतीचे देऊळ आहे. त्यामुळे कडवाड येथे मुंज केल्यास बटूला देव व पितरांचे आशीर्वाद मिळतील असा विचार होता. त्यानुसार पंचवीस मे, २००५ दिवशी राहुलची मुंज गांवी पार पडली. त्या कार्यक्रमाला घरचा प्रमुख या नात्याने मी गावी गेलो होतो. मुंजीचा कार्यक्रम संपवून अन्य मंडळी आपापल्या गावी परतली. मी मात्र दोन्ही बहिणींच्या आग्रहावरून (जान्हवी, कुमुद) त्यांच्याकडे दोन महिने हळगे येथे राहिलो. त्या वास्तव्यात मी ''जांबावली ते आम्बिवली'' या पुस्तकाचे कच्चे लिखाण करून ठेवले. सदर पुस्तकात माझे कौटुंबिक जीवन, समाजकार्य व राजकारण इत्यादींचा सविस्तर असा वृतान्त आलेला आहे.

आत्मचरित्राचा पुढील भाग ''इये ग्रंथाचिये नगरी'' नावाने प्रकाशित होणार आहे. त्या पुस्तकात माझे साहित्यिक जीवन व वाचन, लेखन यांचा तपशील असणार आहे. तसेच साहित्य क्षेत्रातील लेखक, प्रकाशक, ग्रंथविक्रेते, वाचक इत्यादींच्याबाबतीत लिहिले जाणार आहे.

प्रेमानंद काही कामासाठी जुलै २००५ च्या दुसऱ्या आठवड्यात गावी आला होता. त्याच्या सोबतीने मी मुंबईला २४ जुलै रोजी येऊन पोहोचलो.

## जांबावली ते आंबीवली

प्रेमानंदाच्या घरी सर्वांचा आग्रह झाला म्हणून मी त्यांच्याकडे राहिलो. तिथे वास्तव्याला असतांनाच ढगफुटी झाल्यासारखा दोन दिवस अविरत असा मुसळधार पाऊस पडला. मुंबई महानगर तसेच महाराष्ट्र जलमय झाला. पुरासारखी परिस्थिती निर्माण झाली. राज्यभरात हजाराच्यावर माणसे मृत्यूमुची पडली. पुरात अनेक घरे वाहून जाऊन लक्षावधी लोक बेघर झाले. बायको वारल्यापासून माझी अम्बिवली येथील खोलीची व्यवस्था श्री. राजमणी सिंग व त्यांचे कुटुंबीय पाहत असल्यामुळे माझ्या घराची चावी त्यांच्याकडे ठेवलेली असते. मी राहत असलेली जागा उल्हास व काळू नदी यांच्या संगमाजवळ आहे. त्यामुळे माझ्या खोलीत पाणी शिरले की नाही हे समजून घ्यायला मी उत्सुक होतो. मुंबई शहरभरातील लँडलाईन्स तसेच मोबईल फोन ठप्प झाले होते. त्यावेळी माझ्या घरी किंवा मुलीच्या घरी फोन लागत नव्हते. दूरदर्शनवर एक दिवस आम्बिवली रेल्वे स्टेशन व परिसरात झालेला हाहाकार तसेच एक किलोमीटर रेल्वेरूळ वाहून गेल्याची बातमी व वृत्तांत समजला त्यावरून माझ्या घरीपण काहीतरी अनर्थ घडला असावा असा मी अंदाज केला.

तब्बल चौदा दिवस मी प्रेमानंदाकडे राहिल्यानंतर पावसाचा जोरजरा ओसरला व रेल्वे वाहतूक थोडीशी सुरू झाली म्हणून मी कल्याणयेथील मुलीच्या घरी जाऊन पोहोचलो. प्रेमानंद मला पद्मिनीच्या घरी सोडायला सोबत म्हणून आला होता. दुरध्वनी वरून घरी संपर्क होत नसल्यामुळे तसेच कल्याण पुढे रेल्वे जात नसल्याने मी एक दिवस आम्बिवली येथे रिक्षाने पोहोचलो. तिथली दुर्दशा पाहून मी हादरून गेलो. साधारण चौदा तासपर्यंत तळाला राहणारी माणसे कुठे-कुठे उंचवट्यावर व बहुमजली इमारतीवर राहिली होती. असे समजले. माझ्या घरी आठ फुट उंचीपर्यंत पाणी साचलेले होते.त्यामुळे गाद्या-बिद्या,अमूल्य अशी ग्रंथसंपदा,इत्यादींचा मोठ्या प्रमाणावर नाश झाला होता. बारीक-सारीक अशी अनेक भांडी व सामान पूर ओसरतांना वाहून गेले होते.शेजाऱ्यांनी काही सामान जरूर वाचविले होत पण त्यांना आपला जीव वाचविणे व आपले सामान वाचविणे याला प्राधान्य देणे आवश्यक होते.

घराची चावी जरी सिंग यांच्या कुटुंबाकडे होती तरी स्टील कपाटाची चावी माझ्याजवळ होती. त्यामुळे पूर ओसरल्या नंतर साधारण पंचवीस दिवसांनी कपाट खोलले तेव्हां आतील साड्या, कपडे, फाईल्स व पुस्तके यांचा लगदा

होऊन पडला होता. आणखी किमान वीस पुस्तके तरी लिहू शकू एवढी कात्रणे असलेल्या फाईल्स नष्ट झाल्या होत्या. अत्यंत दुःखदायक व क्लेशदायक गोष्ट म्हणजे मी तयार केलेली ''नोकरनामा'' या पुस्तकाची मुद्रणप्रत व निवडून ठेवलेले १४ फोटो व श्रम नष्ट होऊन गेलेले होते. मी सुन्न झालो, पण हिंमत हारलो नाही.

टिटवाळा येथील काही विद्यार्थ्यांची लेखनीक म्हणून मदत घेऊन ते पुस्तक (नोकरनामा) मी नंदिनीच्या घरी राहून परत लिहून घेतले व छापायला पाठविले. एकंदरीत-कच्चा खर्डा, पक्की मुद्रणप्रत, पुन्हा डिक्टेशन व दुरूस्ती, तसेच आणखी एकदा मुद्रणप्रत तयार झाल्यावर केलेल वाचन व दुरूस्ती असा प्रयत्न केला. अशा प्रकारे एकूण चार वेळा वर्षभर अवधी लागून पुस्तक तयार झाले होते.

माझी वाचकमंडळी महाराष्ट्र, गोवा व अन्यठिकाणी पसरलेली आहेत. मी काही वाचक मंडळीशी घरोब्यांचे संबंध जोडलेले आहेत. अशांना मी दूरध्वनी करून जलात्काराने झालेल्या नुसकसानीचे, विशेषत: अमूल्य ग्रंथसंपदा व संदर्भग्रंथांचे झालेल्या नुकसानीची माहिती कळविली. ती माहिती मिळताच अनेक जणांनी मनीऑर्डरने, डिमांडड्रॉफ्ट, तसेच प्रत्यक्ष भेटून पैशाचा पाऊसच माझ्यावर पाडला. पर्जन्यवृष्टीने झालेल्या नुकसानीपेक्षा जास्त पैसे जमा झाले होते. वाचकांचे उदार अंत:करण व प्रेम यांच्या वर्षावाने मी हेलावून गेलो. त्यामुळे मला पुन्हा उभारी आली. यापुढे आणखीही पुस्तके लिहून सरस्वतीदेवीची उपासना सुरू ठेवावी असा निर्धार केला. गोकुळात अतिवृष्टी झाल्यावर श्रीकृष्णाने गोवर्धन पर्वत आपल्या करंगळीवर झेलून लोकांचे रक्षण केले व त्यांच्यात जीवनलालसा उभी केली. तसेच माझ्या वाचकांनी मदत करून मला जीवनात पुन्हा उभे केले.

**

# परिशिष्टे

## १. गौड सारस्वत ब्राह्मण

वेदकालीन सरस्वती नदीवरून 'सारस्वत' हे नाव पडले. ऋग्वेद, महाभारत व स्मृतीत सरस्वती नदीबद्दल अनेक संदर्भ सापडतात. या नदीचा उगम हिमालय पर्वतावर झाला आहे. भारतात आलेले जे आर्य सरस्वती नदीच्या आसपासच्या भागात वसाहती उभारून राहिले, ते लोक स्वतःला ''सारस्वत'' असे म्हणवून घेऊ लागले.

महाभारतातील एका कथेप्रमाणे जीवघेणा प्रदीर्घ असा दुष्काळ पडल्यामुळे सारस्वतांनी पाणी, अन्न व निवाऱ्यासाठी भारत खंडातील वेगवेगळ्या भागात स्थलांतर केले. त्यावेळी भारत उपखंडात ५६ राज्ये (देश) अस्तित्वात होते. ज्ञानार्जन व विद्वता यांच्यामुळे सारस्वत समाजाला कोणत्याही राज्यात जाऊन स्थायिक व्हायला अडचण पडत नसे. उलट, त्यांचे जिथे-तिथे स्वागतच होत असे.

भगवान परशुराम स्वतः सारस्वत होते. सध्याच्या बिहारमधील तिरहत(गौड देश) या ठिकाणाहून परशुरामाने काही ब्राह्मण कुटुंबे कोकणात व गोव्यात आणली. हा प्रवास अनेक दशकांचा होता. त्या दीर्घ स्थलांतराच्या दरम्यान त्यांची माघदी व उडिया या भाषांशी संबंध आला. त्यातूनच त्यांनी आपली स्वतःची अशी भाषा तयार केली. तीच भाषा पुढे ''कोकणी'' म्हणून नावारुपाला आली. बिहार व बंगाल मधल्या 'गौड' देशातून आल्यामुळे त्यांना 'गौड़' ही उपाधी लागली व ते ''गौड सारस्वत बाह्मण'' म्हणून ओळखले जाऊ लागले. सरस्वती नदी ते गौड देश व पुढे गोव्यात येऊन स्थायिक झालेल्या गौड सारस्वत ब्राह्मणांनी 'कोकणी' ही आपली मातृभाषा मानून त्यातून आपले व्यवहार सुरू केले.

स्कंध पुराणातील सह्याद्रीकांड या भागात परशुराम हे श्री विष्णूचे सहावे अवतार असून त्यांनी २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिय केली होती असा उल्लेख आहे. क्षत्रियांचा पराजय करून प्राप्त केलेली सर्व जमीन परशुरामाने ब्राह्मणांना दान म्हणून वाटून टाकली. आपणच दान केलेल्या भूमीवर वसती करून राहणे पशुरामांना अनैतिक व अधार्मिक वाटले. त्यांनी अरेबियन समुद्र मागे हटवून आपल्यासाठी नवीन भूमी मिळविली. त्यालाच 'परशुरामक्षेत्र' असे नाव पडले. उत्तरेला वैतरणी नदी, दक्षिणेला कन्याकुमारी पर्वत सुब्रमहण्यक्षेत्र व सह्याद्री पर्वत. या भागाला पुढे ''सप्त-कोकण'' किंवा ''अपरांत'' (शेवटची जमीन)

अशी नावे प्राप्त झाली. गोमांतक किंवा गोवा हे या सप्तकोकणाचाच भाग आहे. हरिवंशात गोमांचल पर्वतावर श्रीकृष्ण व जरासंध यांचे युद्ध झाल्याचा संदर्भ आहे. नद्या, घनदाट वने व निसर्गसौंदर्याने नटलेल्या गोमांतक भूमीत परशुरामाने वास्तव्य केले व तिथे अनेक पवित्र तीर्थाची (तलाव) व देवालयांची स्थापना केली.

गौड सारस्वत ब्राह्मण समाज जिथे जिथे गेला तिथे तिथे त्यांनी देवालये व समाजोपयोगी संस्था स्थापन केल्या. राजकारण, सरकारी कामकाज तसेच आर्थिक विकासात त्यांना रस होता. वसाहती करून ते राहत असत. दुभाषी, मंत्री, अधिकारी, वकील असे नाना तऱ्हेचे व्यवसाय करून ते समाजात प्रतिष्ठित म्हणून गणले गेले.

पशुरामाने आपल्या सोबत आणलेली ६६ गौड सारस्वत ब्राह्मणांची कुटुंबे गौमांचल पर्वताच्या आसपासच्या आठ 'अग्रहार' खेड्यांतून वसविली कुठाळ, नागवे, शंखावली, केळोसी, मठग्राम (मडगाव) वैरणे, कुडतरी व चोढण.

स्थिरस्थावर झाल्यावर गौड सारस्वत ब्राह्मणांनी उभारलेल्या खेड्यांतून आपणाला इष्ट वाटणाऱ्या देवतांना आपल्या कुलदेवता म्हणून मानल्या. आचार्य गजाननशास्त्री गायतोंडे यांनी लिहिलेल्या 'धर्मबोध' या ग्रंथात सारस्वतांच्या एकूण ३९ कुलदेवता गोव्यात आहेत असे नमूद केले आहे. बहुतांश सर्व कुलदेवता या शिव व शक्ती (पार्वती)च्या नाना रूपात व नाना नावाने प्रख्यात आहेत. ३९ कुलदैवंतापैकी २७ कुलदेव हे शैव देवता असून त्यांचे कुळावी वैष्णव आहेत. माझा कुलदेव गोव्यातील जांबावली येथील दामोदर (अष्टकोणी शिवलिंग) आहे. तसेच आर्यादुर्गादेवी ही गोव्यातील बाटाबाटीच्या काळात कारवार जवळील अंजद्वीपावर भक्तानी नेली होती. तिची प्राणप्रतिष्ठा नंतर अंकोल्यात करण्यात आली आहे.

**

## २. श्री आर्यदुर्गादेवी

पक्षीश्रेष्ठ गरूड आपल्या भक्ष्यांना-सुमुख व दुर्मख या दोन सर्पांना, पंजात पकडून उडून जात असताना त्याची पकड ढिली झाल्याने ते सर्व हिमालयातील शतशृंगपर्वतावरील अती उंच शिखरावर पडले कितीही शोधून न मिळाल्याने क्रोधित होऊन गरूड अजशृंग शिखर बुडासहित उपटून आपल्या पाठीवर घेऊन दक्षिणेकडे उडाला. शेवटी पाठीवरचा भार सहन न झाल्याने तो अगस्ती ऋषींना शरण गेला. अगस्ती ऋषींनी शतावधी ऋषींसमवेत ते पर्वत शिखर उचलून स्वहस्ते समुद्रात स्थापन केले व त्या गरुडाला संकटातून मुक्त केले. अशाप्रकारे स्थापन झालेल्या अजशृंग पर्वताला अजाद्वीप (आर्याद्वीप) नाव पडले.त्यावर राहणाऱ्या दुर्गेला आजादुर्गा-आर्यादुर्गा नाव पडले.

आर्यादुर्गादेवी अजशृंग पर्वतावर राहण्यास कशी आली ? या संबंधीची एक वेगळी कथा आहे. सिंधुद्विप व वेत्रवतीपासून जन्मलेल्या बलशाली वृत्रासुराने भूलोक जिंकून देवेंद्राशी युद्ध करून देवलोक जिंकला. वृत्रासुरामुळे अधिकारच्युत झालेले सर्व देव ब्रह्मदेवास शरण गेले तेव्हा ब्रह्मदेवांनी त्या संबंधी विष्णूंकडे निवेदन केले. वृत्रासुराची वार्ता ऐकून विष्णूला क्रोध आला. त्या रागाच्या भरात त्यांच्या व ब्रह्मदेवांच्या मुखातून भयंकर तेज बाहेर पडले. त्याचवेळी सर्व देवांच्या भालप्रदेशातून अति तेजस्वी तेज बाहेर पडले हे सर्व तेज एकत्र होऊन त्या तेजापासून दिव्यस्वरूपी शक्तीरूपी अशी एक देवता प्रकट झाली.

शंकराच्या दिव्यतेजाने देवीचे केस, विष्णूतेजाने हात, सोमतेजाने स्तन, इंद्रतेजाने पोट, वरूण तेजाने जंघा, भूदेवीच्या तेजाने कंबर, ब्रह्मदेवाच्या तेजाने पाय, सूर्यतेजाने पायांची बोटे, वसुतेजाने हातांची बोटे, कुबेरतेजाने नासिका, प्रजापतितेजाने दात, वायुतेजाने डोळे, संध्या देवतेच्या तेजाने भुवया, अग्नीतेजाने कान तयार झाले. अशा प्रकारे निरनिराळ्या देवतांच्या तेजाने सर्व अवयवयुक्त देवी उत्पन्न झाली. अशा या तेजोशक्तीने उत्पन्न झालेल्या देवीला शिवाने आपले त्रिशुळ, नारायणाने चक्र, ब्रह्माने धनुष्य, इंद्राने वज्रायुध, अग्नीने दिव्यशक्ती, कालदेवाने खड्ग, समुद्रराजाने शंख, क्षीरसमुद्राधिपतीने दिव्य चुडामणी दिला. हिमपर्वतराजाने वाहनासाठी सिंह, तसेच नाना तऱ्हेची रत्ने, घंटा व ऐरावत किरीट, विविध आभरणे अर्पण केली. असे अतिभयंकर रूप धारण करणाऱ्या त्या देवीला पाहून सर्व देव तिची स्तुती करू लागले. कोणालाही दुर्जय व दुर्गम

असल्याने ती देवी 'दुर्गा' या नावाने प्रसिद्ध झाली. दाहीदिशा व तीनही लोक व्यापून असलेल्या दुर्गादेवीला पाहून वृत्रासुर भयभीत झाला. तरी तो अपली सेना घेऊन दुर्गादेवीशी युद्ध करण्यास सज्ज झाला. असुर व देवी यांच्यात महाभयंकर असे युद्ध झाले. देवीने आपल्या अस्त्रांनी राक्षसांची शस्त्रास्त्रे छेदून काढली व भूमंडळाचा थरकाप होईल असा हुंकार करीत राहिली. राक्षस देवीवर चालून गेला, तेव्हा देवीने त्याचे केस धरून त्याचे रूंड धडापासून वेगळे केले. विहसनाच्या सेनेलाही देवीने यमसदनास पाठवले. हे पाहताच महाबलशाली वृत्रासूर नाना तऱ्हेच्या शस्त्रास्त्रांनी देवीवर शस्त्रवर्षाव करीत युद्ध करू लागला. देवीनेही त्याच्यावर शरवर्षाव केला. त्यांच्यात महाभयंकर युद्ध झाले. शेवटी देवीच;या शूल व खड्गाचा प्रहार सहन न झाल्याने वृत्रासूर गतप्राण होऊन पडला. ते पाहून ब्रह्मा, विष्णू, सहवर्तमान सर्व देवांनी देवीला नमस्कार करून तिची स्तुती केली. नंतर सृष्टीकर्त्या ब्रह्मदेवाच्या आज्ञेवरून ती·महादेवी शतशृगं महापर्वतावर जाऊन राहिली ते शिखर अजशृगं म्हणून प्रसिद्ध झाले.

पौराणिक कथेचा भाग सोडल्यास अंजदिव बेटाचे प्राचिनत्व अनेक इतिहासकरांच्या लेखांतून सिद्ध होते. टॉलेमी या भूगोल वेत्त्याच्या लेखात तसेच पेरीप्लसच्या उल्लेखात, चौदाव्या शतकात आलेल्या इब्न बटूटा या अरबी फिरस्त्याच्या प्रवासवर्णनानुसार तेथे मानवी वस्ती होती. काही वर्षांपूर्वी केलेल्या पुरातत्व खात्याच्या समिक्षकांनी भू-सर्वेक्षण केल्यावर प्रागैतिहासिक कालातील मातीच्या पात्रांचे तुकडे व अन्य अवशेषांचा पत्ता लागला आहे. एकंदरीत अंजीदिवाची आदिशक्ती आर्यादुर्गा देवीची स्थापना आदिकदंबाच्या काळात म्हणजे इ. स. पावच्या शतकात झाली असेल किंवा त्याच्या आधीही ती प्रसिद्ध पावली असेल. १५०५ साली पोर्तुगीजांनी अंजीद्विप ताब्यात घेतल्यानंतर तेथील देवालये इत्यादींचा विध्वंस करण्यास सुरुवात केल्यावर तेथील जनतेने स्थलांतर करण्यास सुरूवात केली एका मळ्याळी साधुपुरुषाने देवालयातील देवीची मूर्ती बिणगा येथे आणली. तेथून पुढे दक्षिणेला अंकोला, हनुमट्टा येथे आणली. तेथून तो मळ्याळी मूर्तीला केरळ देशाला घेऊन गेला देवीला ती जागा प्रशस्त नाही असे जाणून श्रीदेवीच्या प्रेरणेने त्याने तिला म्हैसूर येथे नेले तेथे टिपू सुलतानाचे राज्य असल्या कारणाने ते पण अप्रशस्त वाटून परत तो अंकोला, हनुमट्टा येथील आता देवस्थान असलेल्या जागेवर येऊन पोहचला व तेथेचं त्याने श्रीदेवीची मूर्ति स्थापन केली.

## जांबावली ते आंबीवली

श्री भगवान पुराणातील दशम स्कंधातील ७९ व्या अध्यायामध्ये श्री आर्यादुर्गा देवीच्या क्षेत्रांचा उल्लेख आहे. कौरव-पांडवांमध्ये महाभारत युद्ध होण्याचे वेळी बलरामाने आपल्या तीन अक्षौहिणी सैन्याने कौरवांना मदत करण्याचा निश्चय केला व दारात वाट अडवून राहिलेल्या वृद्ध गाईला बाजूला सरकवण्याचा प्रयत्न केला असता ती गाय मरण पावली. गोहत्या निवारण्यासाठी प्रदक्षिणा करुन तेथील पवित्र नदी सरोवरांमध्ये पुण्य स्नान करून आले पाहिजे असे समजून बलराम तीर्थयात्रेस निघाला अनेक तीर्थक्षेत्रांना भेटी देऊन नैमिषारण्यांत आला तेव्हा दीर्घकाल सत्रयाग करून बसलेल्या स्वामींनी बलरामाचा सत्कार केला. यज्ञाच्या वेळी त्यांना ब्रह्माच्या आसनस्थानी बसविले होते. त्यावेळी प्रालीलोमेज व रोमहर्षण उंच आसनावर बसले होते. ते स्वागतास खाली उतरून आले नाहीत म्हणून बलरामास राग आला व त्याने दर्भाच्या अग्रभागाने त्यांना मारून टाकले. त्यामुळे बलरामास ब्रह्महत्याचा दोष निवारण्यासाठी प्रायश्चित्त म्हणून बारा महिने तीर्थक्षेत्री स्नान करण्यासाठी त्याला भारतयात्रा करावी लागली. त्यावेळी उत्तरकाशीहून दक्षिण कन्याकुमारीपर्यंत व तेथून केरळ, त्रिगया ओलांडून सर्वदा शंकराचे सान्निध्य असलेल्या गोकर्ण क्षेत्री तो आला.

बलरामाने गोकर्ण महाबळेश्वराचे दर्शन घेऊन नंतर आर्यादुर्गेचे दर्शन घेतले. द्वैपायनी नावाने प्रसिद्ध व हजारो पवित्र तीर्थांनी युक्त अशा आर्याद्वीपामध्ये असलेल्या आर्यादुर्गेची पूजा करून दंडकारण्य यात्रा करण्यास तो निघाला. यावरून आर्याद्वीप व आर्यादुर्गदेवी महाभारत कालापासून प्रसिद्ध आहे, हे समजते.

* *

# ३. आर्यादुर्गा देवी - देवस्थानाचे वर्णन

उत्तर कन्नड जिल्ह्यातील अंकोला तालुक्याच्या वंदिगे ग्रामात हनुमट्ट्याच्या रस्त्यावर आर्यादुर्गादेवीचे देवस्थान आहे अंकोला गावच्या बसस्थानकापासून जवळपास एक किलोमीटर अंतरावर देवालयाचे महाद्वार आहे. देवालयाच्या जवळ पोहोचताच देवालयाचे शिखर दिसते. देवालयाच्या महाद्वारातून आत शिरताच मुखमंडप दिसतो. त्यानंतर गर्भगृहाचे महाद्वार, पुढे संध्या मंडप व आत गर्भगुडीत श्री आर्यदुर्गेचे दर्शन होते. श्री देवीची प्रतिमा पंचधातूची असून ती चतुर्भज आहे. देवीच्या मागच्या उजव्या हातात चक्र, डाव्या हातात शंख व पुढच्या उजव्या हातात खड्ग, डाव्या हातात ढाल आहे. गळ्यात वैजयंती माळा घातलेली आहे ती देवीला शोभून दिसते.

देवस्थानाच्या प्राकारात परिवार देवता स्थापल्या आहेत. उत्तरेला पश्चिमाभिमुख श्री. चंडिकादेवीचे लहानमंदिर आहे. श्री.चंडिकादेवीला चार हात असून मागच्या उजव्या हातात त्रिशूल आहे. डाव्या हातात डमरू, पुढच्या उजव्या हातात खड्ग, डाव्या हातात बट्टल आहे. श्री चंडिकादेवी क्षेत्रदेवता असून पूर्वीपासून ती इथेच स्थापित आहे.दक्षिणाभिमुख मळियाळ पुरुष आहे. अंजीदिव येथून देवीची मूर्ति घेऊन आलेल्या मळियाळी साधु पुरुषाच्या सात्त्विक सेवेने प्रेरित होऊन श्रीदेवीने स्थळीयांकडून जवळच एक मंदिर बनविले.या पुरुषाच्या डाव्या हातात कमंडलू, उजव्या हातात त्रिशूलदंड, गळ्यात रूद्राक्षमाळा व पायात पादुका आहेत.आग्नेय दिशेला श्री सोमेश्वर देवाची गुडी आहे. मंदिराच्या उजव्या बाजूला पारिजातकाच्या कट्ट्यावर नागकन्या प्रतिष्ठित झाल्या आहेत.

देवस्थानच्या प्राकाराच्या बाहेर महाद्वाराजवळ पश्चिम दिशेला श्री क्षेत्रपालाची गुडी आहे तर पूर्व दिशेला काळभैरवाची गुडी आहे. काळभैरवाच्या गुडीपुढे अश्वत्थाचा कट्टा आहे. विशेष उत्सवाच्या वेळी श्रीदेवीची स्वारी इथे कट्ट्यावर बसते येथे शमीवृक्षाचा कट्टापण आहे.

देवस्थानाच्या सभामंडपात एक लाकडी खांब आहे. या खांबावर गणपतीची मूर्ती कोरलेली आहे.त्याला ''गणपती खांब''असे म्हणतात कोरीव कला असल्यामुळे सुशोभित असलेला हा खांब सुमारे तीनशे वर्षापेक्षा जुना असावा असे समजले जाते. प्रसाद मागण्यासाठी दररोज कितीतरी भाविक देवस्थानात येत असतात.

अशा या पुराणप्रसिद्ध आर्यदुर्गादेवीच्या दर्शनासाठी फक्त कर्नाटकातूनच नव्हे तर जवळच्या गोवा, महाराष्ट्र तसेच दूरच्या गुजरातहून अपार संख्येने भक्तगण येतात व देवीच्या दर्शनाने पावन होऊन धन्य होतात.

**

## ४. अंजद्वीप

कर्नाटक राज्यातील उत्तरकन्नड जिल्ह्याचे केंद्र ठिकाण असलेल्या कारवारपासून पाच किलोमीटर अंतरावर पाच द्विपांचा समूह आहे.'अंजदिव' म्हणजे 'अंजि'(पाच) 'दीव्' (द्विप), पाच बेटांचा समूह देवगड, कूर्मगड, मदलिंगड,सानगड व अंजदीव. पौराणिक संप्रदायाप्रमाणे त्या द्विपाला 'आंजाद्वीप' अथवा 'आर्याद्वीप' असे म्हणतात इथे असलेल्या मूल–मातृ देवतेला 'आजादुर्गा' अथवा 'आर्यादुर्गा' हे नाव ठेवले गेले.हे द्वीप पूर्वी पोर्तुगिजांच्या अखत्यारित असलेल्या गोव्याला जोडले गेले होते.तेथील पुरातत्व खात्याच्या समीक्षकांनी काही वर्षापूर्वी भू–सर्वेक्षण केल्यावर प्रागैतिहासिक कालातील मातीच्या पात्रांचे तुकडे व अन्य प्राक्तन आवेशेषांचा पत्ता लागलेला आहे.त्या सर्वेक्षणात मोठ्या हंड्या,नळ्याचे चुरू,मध्यकालीन मंदिरांचे स्तंभ,तळपायाच्या फळ्या इ. वस्तू मिळाल्या आहेत.त्या आधारावर इथे प्राचीनकालापासून लोकांची वस्ती होती असा निष्कर्ष काढण्यात आला. समुद्रापलीकडील व्यापार,उद्योगाच्या दृष्टीने हे स्थान सुरक्षित होते.हे द्विप जिंकणे, वसाहत करणे व दूर–दूरच्या ठिकाणाशी संपर्क साधणे हा प्रतिष्ठेचा विषय होता.

अंजदीवात प्राचीन शासनाचे दाखले पहिल्या कदंबांच्या कालांत समावेश पावलेले दिसतात.पहिला कदंबराजा रविवर्माचिया काळाचा होन्नावर येथील ताम्रपटात त्याचा उल्लेख आहे.कैकेय चित्रसेन महाकेल्ल राजा आपल्या सत्तेच्या प्रथमवर्षी अंबद्वीप म्हणजे अंजदीवात राज्य करत होता असे सांगितले जाते.

जवळ जवळ क्रि श.पाचव्या शतकाच्या दरम्यान म्हणजे एक हजार सातशे वर्षापूर्वी अंजदीवात आदिकदंब राजे राज्य करीत होते तेव्हां ते विजय अंबुद्वीप' ह्या नावाने प्रसिद्ध होते.त्या द्विपातून केल्ल चित्रसेन राज्य करीत असे हे शासन सिंहसेनपतीचा पुत्र जिननंदी सेनापतीने अंकित केले होते असा उल्लेख सापडतो

ख्रिस्ती शतकाच्या पूर्वीपासून हे द्वीप एक महत्त्वाचे व्यापारी दळणवळणाचे केंद्र होते. इथून अनेक देशांशी व्यापारी संपर्क चालू होता इथला वैश्य (वाणी) समाज बराच श्रीमतं होता. त्यांची कुलदेवता म्हणजे 'आर्यभगवती'
किंवा 'आर्यादुर्गा' ही होती.

पोर्तुगीजांनी १५०५ साली हे बेट–जिंकून तिथले आर्यादुर्गेचे देवस्थान पाडून तिथे चर्च बांधले तिथली आर्यादुर्गेची मूळ मूर्ति अंकोल्यात सध्या देऊ ळ असलेल्या जागी स्थलांतर झाली आहे. **

## ५. कडवाड

'कडेवाडी'(शेवटची वाडी)या शब्दावरून 'कडवाड' हा शब्द तयार झाला असे सांगण्यात येते.सोंदे राजांच्या काळात कडवाड हे राज्यकारभाराचे या भागातील प्रमुख स्थान होते. कडवाडच्या अधिपत्याखाली एका बाजूने सदाशिव गडपर्यंतची जागा व दुसऱ्या बाजूने आजद्वीपपर्यंत त्याची सरहद्द होती. दक्षिण भारतातून अरब देशांना निर्यात करण्यासाठी म्हणून अनेक वस्तू सह्याद्री पर्वताच्या रांगांतून यल्लापूर तसेच कैगा घाटातून कडवाडला आणल्या जात.

कडवाडमधून सामान घेऊन गलबते समुद्र मार्गाने पुढे जात येत असत. त्यावर जकात आकारण्यासाठी म्हणून कडवाडच्या पश्चिम दिशेला असलेल्या ठिकाणी 'जकातकट्टा' स्थापन करण्यात आला. त्या भागात जनवस्ती वाढल्यावर त्याचे 'सुंकेरी' असे नामकरण करण्यात आले.कन्नड भाषेत 'सुंकद-केरी' म्हणजे 'कर गल्ली' असा अर्थ होतो.

या विभागात देशातील अनेक धर्माचे अनुयायी येऊन राहिले होते. त्यापैकी बौद्ध, जैन व नाथसंप्रदायाचे लोक इ.स.पूर्वी इथे आले होते. त्याचे पुरावे सापडतात.सध्या इथे बौद्ध व जैनधर्माच्या खुणा दिसत नसल्या तरी नाथसंप्रदायाच्या खुणा मात्र भरपूर प्रमाणात आहेत. नंदनगद्दे, कठीणकोण व सुंकेरी येथे प्रत्येकी एक-एक अशी नागनाथाची देऊळे त्याची साक्ष देतात.

याच काळात मध्वाचार्यांचा एक शिष्य कडवाडला येऊन त्याने व्यंकटरमण देवस्थान(वैष्णवमठ)स्थापन केला.साधारण १४व्या शतकात या मठाची स्थापना झाली असे समजण्यात येते.या मठाच्या समोरील डोंगराच्या पायथ्याशी श्री मारूतीचे एक लहानसे देऊळपण कुणीतरी त्याच काळात बांधलेले होते. कडवाड गावाचा ग्रामदेव म्हणजे महादेवाचे देऊळ.त्या देवळाच्या देखभालीसाठी व देवस्थानाच्या सर्व सेवा अखंडित चालू राहाव्यात म्हणून सोंदे राजाने ६० कुंभ (चाळीस खंडी म्हणजे एक कुंभ) एवढे भाताचे उत्पन्न येईल अशी जमीन दान म्हणून दिली होती.कडवाडच्या शेजारीच 'शेजवाड'या गावी 'शेजेश्वराचे देऊळ आहे.हे देऊळ गोकर्ण येथील महाबळेश्वर देवस्थानाएवढेच पवित्र मानले जाते

गोव्यातील पोर्तुगीज शासनाने कार्मेलाईट कॉनव्हेंटच्या लोकांना गोव्याबाहेर पळवून लावल्यावर त्यातील काहीजण कडवाडला येऊन स्थायिक व्हायला बघत होते. पण तिथल्या गावकऱ्यांनी संघटितपणे विरोध केल्यावर ते जवळील सुंकेरी गावात जाऊन त्यांनी तिथे चर्चची स्थापना केली.(१७०९) पुढे यथावकाश

कडवाडला किरिस्तांववाडा उदयास आला.

गोव्यात पोर्तुगिजांनी बाटाबाटीचा जोर लावल्यावर आपली संस्कृती, भाषा, देव व धर्म टिकविण्यासाठी म्हणून अनेक ब्राह्मण कुटुंबे राना-वनातून प्रवास करून कडवाडपासून खानापूर या भागात स्थायिक झाले. अन्य काही ब्राह्मण कुटुंबे गलबतांच्या मदतीने अंकोला, कुमठा, होन्नावर, भटकळ, मंगळूर व पार केरळातील कोचीनपर्यंत जाऊन स्थिरावले. हा ब्राह्मण वर्ग सुशिक्षित होता व त्यांच्यात स्मार्त व वैष्णव असा भेद होता स्मार्त लोक शैव पंथी (शंकरभक्त) व वैष्णव भागवत पंथी (विष्णूचे भक्त). या शिकलेल्या लोकांना 'शेणवी' असे म्हणत. त्यातील बरेचजण विदेशी लोकांचे दुभाषी म्हणून काम करत. काहीजण सोंदे राजा व नंतर आदिलशाहीच्या राज्यात कारभारी म्हणून नोकरीला लागले.

सदाशिव राया नायक या सोंदा राजाने काळी नदी व अरबी समुद्राच्या संगमावर असलेल्या चित्ताकुला या ठिकाणी एक भक्कम असा किल्ला बांधला. तो किल्ला 'सदाशिवगड' या नावाने ओळखला जाऊ लागला. शिवाजी महाराजांनी पोर्तुगिजांच्या विरूद्ध स्वारी करून कडवाडामार्गे जाऊन सदाशिवगड काबिज केला. तिथे ते काही दिवस राहिले असताना त्यांनी आपली कुलस्वामिनी भवानीचे लहानसे देऊळ तेथे बांधले. त्यांच्या सैन्यात स्थानिक. भंडारी समाज मोठ्या प्रमाणात भरती झालेला होता. म्हणून त्या देवळाचा कारभार त्यांच्या हवाली करून शिवजी महाराज माघारी परतले

हैदरअली (१७६३-१७७२) व त्यानंतर गादीवर आलेला त्याचा मुलगा टिपू सूलतान याने हा भाग पादाक्रांत करून आपल्या राज्याला जोडून घेतला.तेव्हाही कडवाड हेच या भागातील शासनाचे मुख्य केंद्र होते. पुढे इंग्रजांनी हा भाग जिंकून घेऊन कडवाडला एक बंदर व कारखाना स्थापण्याचा विचार केला. पण कडवाड बंदर हे वर्षानुवर्षे डोंगरावरून येणारी माती व गाळ यांच्यामुळे समुद्रपर्यटनाला त्रासदायक ठरू लागले. त्यावर उतारा म्हणून इंग्रजांनी कडवाडपासून पश्चिमेला असलेल्या 'कोणे' या गावी एक भक्कम असे बंदर उभारले. 'कडवाड' या नावावरूनच त्यांनी 'कारवार' हे नाव नव्या शहराला दिले. इंग्रजांनी अशाप्रकारे बऱ्याच ठिकाणी 'ड' चा र 'र' असा उच्चार करून गावाची नावे बदललेली आहेत. उदा. धारवाडचे त्यांनी धारवार केले; बडोद्याचं बरोदा केलं. कारवार बंदरातून देशांतर्गत व देशाबाहेर व्यापारी दळणवळण सुरू झाल्यावर कडवाडचे महत्त्व कमी झाले.

**

## ६. वंशवृक्ष


अनंत - सत्यभामा
विठ्ठल-रूक्मिणी
देवीदास - पद्मावती
विठ्ठलराय-अनुराधा
पद्मिनी(अश्विनी)
आनंद गायतोंडे
नंदिनी-अवधूत
पै
आबोली
अनीशा

*******

## विठ्ठलराय भट

जन्म : ५ मे १९३५ कडवाड (कारवार) येथे

नोकरी : सरकारी, निमसरकारी, खाजगी अशा एकूण पंधरा आस्थापनांपासून नोकऱ्या करून निवृत्त. (३१-१२-९२)

लेखन : अजूनपर्यंत बावीस मराठी व तीन इंग्रजी पुस्तके प्रकाशित. इंग्रजी माध्यमातून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना मदत व्हावी म्हणून इंग्रजीतून २५ छोट्या पुस्तकांचा संच (चरित्रे) प्रकाशित.

अवगत भाषा : मराठी, हिंदी, इंग्रजी, संस्कृत, कन्नड व कोकणी.

छंद : वाचन, लेखन, वक्तृत्व, प्रवास व संगीत श्रवण

पुरस्कार : अमेरिकन बायोग्राफिकल इन्स्टिट्यूटतर्फे 'Man of the year, 1996' हा पुरस्कार घोषित. (अपंगत्व, गरिबी, शिक्षणाची असुविधा असतानाही जिद्दीने साहित्य, सामाजिक व शैक्षणिक क्षेत्रांत उल्लेखनीय कामगिरी केल्याबद्दल.

विशेष : १९९६ साली पार पडलेल्या एकसष्ठी समारंभाचा वृत्तांत व जीवनचरित्र मुंबई, पुणे, कोल्हापूर, अकलूज, बेळगांव, रत्नागिरी, गोवा, कारवार व कुमठा येथील वृत्तपत्रांतून सचित्र प्रकाशित.

